# जगाचे प्रवासी

भाग ३ रा




लेखक

प्रो. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.

किंमत १। रुपया

# प्रास्ताविक

' जगाचे प्रवासी ' या मालेचें हें तिसरें व शेवटचें पुस्तक आहे. हीं तीनही पुस्तकें जर विद्यार्थ्यांनीं काळजीपूर्वक वाचलीं, तर मार्कोपोलो, ह्युएनत्सँग यांच्यापासून तों अमुंडसेन आणि पीरी यांच्या पर्यंतच्या सर्व प्रमुख संशोधकांची व प्रवाशांची ओळख त्यांना होईल. या सर्वांच्या संगतींत आपला कांहीं वेळ आपण घालविला, या जाणिवेनें त्यांना बरें वाटेल. यांनीं केलेल्या प्रवासांचीं मूळ वृत्तें इंग्रजी भाषेंत फार विस्तारानें लिहिलेलीं आहेत. तीं वाचणें प्रौढ विद्यार्थ्यांच्या सुद्धां आवाक्याच्या बाहेरचें आहे. अर्थात् तीं वाचून त्यांचा मुख्य मतलब आपल्या विद्यार्थ्यांच्या आटोक्यांत आणून सोडणें हें काम मी हातीं घेतलें; आणि या तिसऱ्या पुस्तकानें तें आतां पूर्ण झालें आहे. कांहीं कांहीं प्रवाश्यांचीं नांवें यांत सांपडणार नाहींत; पण सर्वांचाच संग्रह करूं म्हटलें तर, योजनेचा विस्तार फार झाला असता आणि कदाचित् त्यांचें वाचन कंटाळवाणेंही झालें असतें. म्हणून केलेली निवड सामान्यपणें बरोबर आहे, असें मला वाटतें.

पेकिंगपासून आरंभ केला आहे असें धरलें तर तेथून थेट पश्चिमेकडे कॅस्पियन समुद्रापर्यंत आपण गेलों व तेथून दक्षिणेकडे उतरून भरतखंडांत आलों. वाटेनें आपल्याला केवढीं तरी वाळवंटें लागलीं; किती पर्वत भेटले; आपण किती तरी गुहा पाहिल्या; नद्या पोहून गेलों; भरतखंडांतील राजेरजवाड्यांच्या दरबारांची शोभा पाहिली; विद्वानांचीं मंडळें चर्चा करीत असलेलीं पाहिलीं; आणि संत–महंतांचे मठही पाहिले. मध्य

आशियांतील निरनिराळ्या जातींच्या आणि जमातींच्या चालीरीतीही आपण पाहिल्या; आणि चिनी समुद्रांतून जलमार्गानें यवद्वीप, मलयद्वीप अशी यात्रा करीत करीत आपण सिंहलद्वीपांत आलों. तेथून प्रत्यक्ष भारतांत येऊन प्राचीन महाराष्ट्रांतील लोकांची ओळख आपण करून घेतली. मग पश्चिम समुद्र ओलांडून आपण आफ्रिकेच्या किनाऱ्याला लागलों. झांबेजी नदीच्या मुखांतून आपण आंत शिरलों; आणि वर जाऊन टांगानिका सरोवर, मध्य आफ्रिकेंतील दलदलीचे प्रदेश, हें सर्व पहात पहात आपण आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्याला जाऊन लागलों. तेथून परत फिरून कॉंगो नदीच्या कांठाकांठानें आपण बरेच दिवस फिरलों; आणि नायगर नदीचें अवलोकन करून, थेट दक्षिणेकडे केप ऑफ् गुड होपपर्यन्त आलों. मग आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यानें हिंडत हिंडत अनेक वादळांतून आणि संकटांतून नीभावून आपण स्पेन–पोर्तुगालला जाऊन पोहोंचलों.

पुढें इंग्लंडची आणि हॉलंडची हवाही आपण पाहिली; आणि तेथून नॉर्वे देशांत शिरलों. मग नॉर्वेच्या उत्तर किनाऱ्यानें आर्कतिक् समुद्राच्या थंडाव्यांत आपण गेलों आणि आर्केंजलवर मुक्काम करून, सरकगाड्यांत बसून मॉस्कोला आलों व तेथून बुखारापर्यंत येऊन पोहोंचलों. पुन्हां उत्तरेकडे जाऊन नोव्हाझेम्ला इत्यादी बेटांत जाऊन उत्तर-ध्रुवाकडे आपण धूम ठोकली. ग्रीनलंडचा बर्फाचा विस्तार आपण पायांखालीं घातला आणि मग कॅनडाच्या उत्तरेला जीं अनेक लहान मोठीं द्वीपकल्पें आहेत, त्यांच्या पोटांतील पाण-वाटांनीं किती तरी वेळ फिरत राहिलों. तिकडील एस्किमो लोकांच्या ओळखी आपण करून घेतल्या; सोन्याचांदीच्या खाणी पाहिल्या; आणि मग दक्षिणेकडे येऊन अमेरिका खंडाच्या पूर्व किनाऱ्याला लागलों.

तेथल्या येरझारा पुऱ्या झाल्यानंतर, वादळानें व्याप्त झालेल्या अटलांटिक-मधून आपण ब्राझीलच्या किनाऱ्याला लागलों. खालीं जातां जातां आपण

फॉकलंड बेटांपर्यंत जाऊन पोहोंचलों; आणि मग तेथून पूर्वेकडे प्रदीर्घ जलप्रवास करून ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड या बेटांची रुक्ष हवा आपण पाहिली. तेथें फार वेळ न थांबतां, मोठमोठ्या साहसी नावाड्यांच्या संगतींत, आपण दक्षिण–ध्रुव प्रदेशांत शिरलों आणि शेवटीं प्रत्यक्ष दक्षिण ध्रुवाकडे धूम ठोकली. तेथून परत वळून आपण पुन्हां अमेरिकेच्या दक्षिण टोकाला आलों; आणि मग प्रशान्त महासागरांत म्हणजे पॅसिफिक महासागरांत शिरलों. या सागराची उदास शोभा पहात पहात आपण मसाल्यांच्या बेटांत येऊन ठेपलों; आणि फिलिपाइन्स बेटांत उतरून अनेक रानटी लोकांची ओळख करून घेतली. तेथून आपण पुन्हां भारताकडे परत आलों. याचा अर्थ असा कीं, आपण बहुतेक सर्व पृथ्वीभर फिरलों.

ज्या लोकांच्या संगतींत ही पृथ्वी–प्रदक्षिणा आपण केली ते लोक केवढे साहसी होते पहा ! सध्यांच्या काळीं पृथ्वी–प्रदक्षणा करणें किती सोपें काम झालें आहे. दळणवळणाचीं आणि प्रवासाचीं साधनें सुलभ आणि विपुल झालेलीं आहेत, आणि प्रवासांत कसलींहीं संकटें उरलेलीं नाहींत. उलट सर्व प्रकारच्या सुखसोईनीं तो मोठा रुचकर आणि मौजेचा बनलेला आहे. पण प्राचीन काळच्या ज्या लोकांच्या संगतींत आपण फिरलों, त्याच्यावर केवढीं तरी संकटें आलीं होतीं ! त्यांना किती हाल सोसावे लागले होते; आणि त्यांच्या जिवावरही कितीदां बेतलें होतें. पृथ्वी सपाट आहे कीं गोल आहे, समुद्राला अंत आहे कीं नाहीं, समुद्राच्या पलीकडे सैतानाची भूमि आहे कां माणसांनीं वस्ती केलेली धरणी आहे, यासंबंधीची सुद्धां निश्चित कल्पना लोकांना नव्हती. आणि ज्यांना शास्त्रज्ञ म्हणावयाचें त्यांचें ज्ञान सुद्धां अगदींच तोटकें होतें. तेव्हां आपल्या या प्रवाशांनीं केवळ जिज्ञासा म्हणून आपले जीव धोक्यांत घातले; आणि अज्ञात पृथ्वीचीं ठिकाठिकाणचीं कवाडें त्यांनीं मोकळीं करून टाकलीं.

## प्रास्ताविक

उत्तर ध्रुवाचा किंवा दक्षिण ध्रुवाचा शोध करणारांच्या संगतींत आपण जात असतांना, आपल्या मनांत असा विचार सहज येऊन गेला असेल कीं, इतके हाल सोसून, आणि इतके जीव संकटांत घालून प्रवास करीत राहण्यांत काय तात्पर्य आहे ? पण दर वेळीं, आपण ध्यानांत ठेवावयास हवें कीं, जिज्ञासा ही एक विलक्षण प्रभावी शक्ति माणसाच्या मनांत विधात्यानें खोवून ठेवलेली आहे. ती त्याला स्वस्थ बसूं देत नाहीं. जें माहीत नसेल, तें माहीत करून घेतलेंच पाहिजे ही उत्कंठा माणसाला सारखी लागलेली आहे. अत्यंत प्राचीन कालापासून तों तहत आतांपर्यंत या उत्कंठेनें माणसाला वेडें बनाविलें आहे; आणि म्हणून, भूपृष्ठाचेंच काय पण भूगर्भाचें आणि अंतरिक्षाचे केवढे तरी प्रवास माणसानें केलेले आहेत. भौतिक शास्त्रांचे सर्व शोध यामुळेंच लागलेले आहेत. आणि सृष्टिकर्त्यानें पेरून ठेवलेलीं निरनिराळीं गूढ सामर्थ्यें माणसानें उघडकीस आणलीं आहेत. तो एवढ्यावरच संतुष्ट राहील असेंही दिसत नाहीं. ज्ञानाचा ओळखीचा झालेला परगाणा जेवढा आहे, त्याच्या लाखपट मोठा ओळखीचा न झालेला ज्ञानाचा परगाणा आहे आणि त्यांत मोठमोठाले संशोधक लोक मोठ्या ईर्षेनें शिरत आहेत.

ज्या मोठमोठ्या संशोधक–शास्त्रज्ञांना आज आपण मनोभावें वंदनें करतों ते मोठे आहेतच. पण त्यांच्या मोठेपणाचीं उगमस्थानें कोठें आहेत म्हणून पहात पहात तुम्हीं भूतकाळांत गेलांत तर असें दिसेल कीं, ज्या निर्भय आणि साहसी प्रवाशांनीं आणि नावाड्यांनीं अखिल भूपृष्ठ मोठ्या हिमतीनें शोधून पाहिलें, त्यांच्या जिज्ञासेंतून आणि साहसांतून सध्यांची शास्त्र–शोधाची प्रवृत्ति उत्पन्न झालेली आहे. त्या प्रवाशांची आणि नावाड्यांचीं पराक्रमाचीं कृत्यें या तीन पुस्तकांत विद्यार्थ्यांना व इतर वाचकांना वाचावयास सांपडतील.

पण हीं पुस्तकें विद्यार्थ्यांनीं किंवा प्रौढ माणसांनीं केवळ करमणूक म्हणून वाचतां कामा नये. त्यांची जिज्ञासा तीव्र व्हावी; आपल्या पूर्वजांपैकीं ज्ञानाचे खरे खरे मित्र कोण होऊन गेले हें त्यांना कळावें; आणि त्यांच्या ठिकाणींही ज्ञान–संपादनाची स्फूर्ति उत्पन्न व्हावी यासाठीं, 'जगाचे प्रवासी' ही छोटीशी पुस्तकमाला लिहिली आहे.

श्री. गजाननराव ठोकळ यांनीं या पुस्तकाच्या प्रकाशनाचें काम अंगावर घेतलें व मूळ संकल्पाप्रमाणें त्यांना व मला ठरलेल्या मुदतींत हें तडीस नेतां आलें, याचा फार आनंद वाटतो. हीं सर्व पुस्तकें माझ्या सांगण्या-प्रमाणें लिहून काढण्यांत श्री. पांडुरंग बर्वे या हुषार व रसिक विद्यार्थ्यानें अतिशय मेहनत घेतली, हें मला मुद्दाम सांगितलें पाहिजे. श्री. बाळासाहेब गुर्जर, श्री. देशपांडे व श्री. मुळगांवकर यांनीं छपाईचें व चित्रांचें काम उत्कृष्ट केलें याबद्दल आम्हीं दोघे त्यांचेही फार आभारी आहों.

श्रीपाद महादेव माटे

# अनुक्रमाणिका







# फर्डिनंड मॅगेलन्

## पहिली पृथ्वीप्रदक्षिणा

मॅगेलन् या पोर्तुगीज नावाड्यानें पृथ्वीच्या भोंवतीं पहिली सफर केली. म्हणून भूपृष्ठसंशोधकांत त्याचें नांव अजरामर झालेलें आहे. स्वतः मिळविलेलें हें अद्‌भुत यश भोगावयास तो जिवंत राहिला नाहीं; तथापि त्यानें पोर्तुगाल देशाला हा मोठा मान मिळवून दिला. आजपर्यंत जे मोठे धाडसी नावाडी होऊन गेलेले आहेत त्यांत या दर्यावर्दी माणसाचें नांव कदाचित् पहिल्या ठिकाणींही घालावें लागेल. याच्या मनाला भीति कधीं शिवलीच नाहीं आणि हातीं घेतलेलें काम यशस्वी करण्यासाठीं वाटेल तें साहस करण्यास तो कधीं कचरला नाहीं.

फर्डिनंड मॅगेलन हा १४८० या वर्षी पोर्तुगालमध्यें एका खानदानीच्या घराण्यांत जन्माला आला. लहानपणापासूनच राजाच्या घरीं त्याची ये जा सुरूं झाली. पोर्तुगालच्या राजघराण्याला भूपृष्ठसंशोधनाचें केवळ वेडच लागलेलें असे. स्वाभाविकपणेंच मॅगेलन याच्या कानावर या संशोधनाच्या हकीकती लहानपणापासून पडूं लागल्या होत्या आणि तो पंचवीस एक वर्षांचा झाला, तेव्हां समुद्रपर्यटनाच्या आकांक्षेनें त्याचें मन केवळ

भारून गेलें होतें. १५०८-०९ या वर्षी, पोर्तुगालमधून मलाका आणि लंका इकडे एक सफर निघाली; तेव्हां मॅगेलन तिकडे गेला. जावें तेथें जिवावर बेतावें, असा त्याच्या नशिबाचा योगच होता. लंका बेटांत आपल्या जहाजावर मसाल्याच्या मोठमोठाल्या गोण्या त्याचे लोक भरत होते. तों इतक्यांत, तेथल्या कांहीं लोकांनीं त्याच्यावर अचानक हल्ला केला. मॅगेलनच्या जहाजावरील कित्येक लोक मरण पावले. हा स्वतः मात्र, नशीब शिकंदर म्हणून या अरिष्टांतून कसाबसा बचावला !

हिंदी महासागरांत हिंडत असतांनाच त्याच्या मनांत अशी एक कल्पना येऊन चुकली कीं, पूर्व दिशेला जावयास पश्चिमेच्या बाजूनेंच वाट सांपडेल. स्वदेशांत परत जातांच त्यानें ही कल्पना स्पेनचा राजा पांचवा चार्लस् याच्यापुढें मांडली. वास्तविक पाहतां पोर्तुगालचा राजा मॅन्युअल याला त्यानें ही कल्पना सांगावयास हवी होती. पण त्यानें ती सांगितली नाहीं; कारण या राजाच्या नोकरींत असतांना आठदहा आणे पगारवाढीबद्दल मॅगेलननें रदबदली केली असतां मॅन्युअलनें त्याला नकार दिला होता. असल्या कद्रु राजापुढें पुन्हां तोंड वेंगाडावयास नको, म्हणून त्यानें आपली कल्पना स्पेनच्या राजाला सांगितली. चार्लस्नें होकार दिला आणि त्याची सर्व तऱ्हेची तरतूद करून देऊन त्याला सांगितलें कीं, अमेरिकेच्या पलीकडे असलेल्या समुद्रांत प्रवेश करण्यासाठीं एकादी सामुद्रधुनी तूं हुडकून काढली पाहिजेस. ही काढलीस तर, आपल्याला मोल्युकाज बेटांकडे एकदमच जातां येईल. ठरल्याप्रमाणें १५१९ च्या ऑगस्ट १० रोजीं, पांच जहाजांचा तांडा घेऊन मॅगेलन सिव्हिली बंदरांतून निघाला. बरोबर सुमारें अडीचशें लोक होते. त्यांपैकीं बरेचसे पोर्तुगीज होते. बाहेर पडतांच त्याच्या सासऱ्याकडून त्याला निरोप आला कीं, तुम्हीं स्पेनच्या राजाकडे आश्रयार्थ गेलांत म्हणून राजे मॅन्युअल

फार रागावले आहेत आणि तुमची ही संशोधनाची सफर अपेशी करण्यासाठीं ते नाना प्रकारचे इलाज योजीत आहेत. तुमच्या संगतींत जीं पोर्तुगीज माणसें आहेत, त्यांच्यावर नीट नजर ठेवा; कारण, मॅन्युअलकडून कानमंत्र घेऊन आलेले बरेच लोक त्यांत आहेत.

राजा मॅन्युअल यानें खरें पाहतां याच्या आधींही एक कपट रचलेलें होतें. मॅगेलन आणि चार्लस् यांचें जमत आहे असें ऐकतांच मॅगेलन याला जिवें मारून टाकावें, असाही बेत त्यानें केलेला होता. पण तो सिद्धीस गेला नाहीं. मॅगेलन भला धट्ट मनुष्य होता. आपल्या संगतींत कोण कोण आहेत, ते काय बोलतात, काय करतात, यावर चांगली पाळत ठेवून त्यानें पर्यटनाचें काम जोरानें सुरूं केलें.

सरळ दक्षिणेकडे आफ्रिकेच्या कांठाकांठानें बराच दूरपर्यंत तो गेला. मग अनुकूल वारा पाहून तो पश्चिमेकडे निघाला. जातां जातां तो ब्राझिलच्या किनाऱ्याला लागला. रिओ डि जेनिरो या बंदरांत सामानसुमानाचा नवा पुरवठा त्यानें करून घेतला; आणि जहाजें पुन्हां हांकारून, ब्राझिलच्या कांठानें दक्षिणेकडे जाऊन १५२० च्या जानेवारी १० च्या सुमारास तो रिव्हर ला प्लाता येथें पोहोंचला. त्याला वाटलें कीं, या नदीच्या मुखाच्या आसपासच कोठें तरी, आपल्याला हवी असलेली सामुद्रधुनी असावी. परंतु जावें तेथें जमीनच लागूं लागली ! म्हणून शेवटीं या खंडाच्या दक्षिणेच्या किनाऱ्यानें तो चालला. मार्च महिन्याच्या शेवटीं पोर्ट सेंट ज्युलियन येथें तो येऊन पोहोंचला. आतां सारा हिंवाळा येथेंच घालवावा असें त्यानें ठरविलें.

लवकरच लहान मोठ्या अधिकाऱ्यांची त्यानें एक सभा भरवली आणि सफर पुढें चालवावी कीं कसें, याविषयीं त्यांची सल्ला मसलत घेतली. बहुतेक सगळे अधिकारी आणि कर्णधार यांचें मत असें पडलें

कीं, झालें आहे एवढें संशोधन पुरें करावें आणि आपण तडक स्पेनला परत जावें. हिंवाळा सुद्धां येथें घालवूं नये. कारण ही भूमि म्हणजे एक भयंकर रेताडच आहे. मॅगेलन्‌ला हा सल्ला बिलकूल मानवेना. तो म्हणाला ' मग आपण घरून निघालों कशाला ? आतांपर्यंत संशोधन असें कांहींच झालेलें नाहीं. म्हणून तुमचा सल्ला मला बिलकूल मान्य नाहीं. मी असाच पुढें जाणार ! ' हे त्याचे निकराचे शब्द ऐकतांच ते अधिकारी आणि ते कर्णधार अगदीं खवळून गेले; आणि तीन जहाजांच्या कप्तानांनीं उघड बंड केलें व मॅगेलन् याला निरोप धाडला कीं, सर्व कप्तानांची बैठक एकदम भरवावी. मॅगेलन् यानें हें पत्करलें, पण अट एवढीच घातली कीं, ही बैठक आपल्या स्वतःच्या जहाजावर भरली पाहिजे. ते बंडवाले कप्तान म्हणाले, ' ही अट आम्हांला बिलकूल मान्य नाहीं. ' मॅगेलन् अतिशय संतापून गेला. पण गप्प बसून त्यानें एक निराळाच क्रूर इलाज योजला.

कानमंत्र देऊन त्यानें आपले कांहीं लोक मेंडोझा कप्तानाच्या जहाजावर धाडले. त्यानें त्यांना येऊं दिलें. ते म्हणाले कीं, ' तुम्हांला मॅगेलन् यांनीं बोलाविलें आहे. ' मेंडोझानें मॅगेलनच्या जहाजावर जाण्याचें साफ नाकारलें. यावर, त्या आलेल्या लोकांपैकीं एकजण हातांत सुरा घेऊन त्याच्या अंगावर धांवला; आणि तो त्यानें त्याच्या नरड्यांत खुपसला. मागोमाग मॅगेलन्‌च्या जहाजावरची आणखी एक तुकडी तेथें येऊन पोहोंचली. मेंडोझाच्या हत्येमुळें झालेल्या गोंधळांत शिरून या नव्या आलेल्या माणसांनीं अधिकच गोंधळ माजवून दिला आणि थोड्याच वेळांत तें जहाज त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलें. आणखी एका जहाजाचा कप्तान मॅगेलन्‌ला अनुकूल होता. याचा अर्थ असा झाला कीं, त्याचें स्वतःचें एक, मेंडोझाचें दुसरें आणि या अनुकूल मतवाल्याचें तिसरें, अशीं

तीन जहाजें त्याच्या अंगाला झालीं. येवढ्यानिशीं उरलेल्या दोन बंडखोर जहाजांवर तो तुटून पडला. त्याचे कांहीं मित्र त्याच्यासारखेच अतिशय निर्भय लढवय्ये होते. सर्वांनीं मिळून बंड साफ मोडून टाकलें. वचक बसावा म्हणून त्यानें मेंडोझाचें शीर तोडलें आणि ज्या कांहीं खलाशांनीं विशेष गडबड केलेली होती, त्यांच्याही माना त्यानें कापून टाकल्या. अशा प्रकारें बंडाचा पूर्ण बिमोड झाला आणि तो सारा हिंवाळा या लोकांनीं ठरल्याप्रमाणें तेथें घालविला.

**पॅटागोनिया** नांवाच्या या प्रदेशाच्या लोकांशीं मॅगेलनच्या खलाशांची ओळख झाली. हे तद्देशीय लोक मोठे धिप्पाड दिसले. म्हणून हे स्पॅनिश लोक त्यांना राक्षस असेंच म्हणूं लागले. त्या लोकांचा एकंदर रुबाब असा ऐटदार होता कीं, यांतले कांहीं लोक आपल्यापाशीं ठेवून घ्यावे असें मॅगेलन्‌ला वाटूं लागलें. पण त्यांना धरावयाचें कसें हा प्रश्न होता. म्हणून या लोकांनीं एक हिकमत योजली. मित्र-भावाची बतावणी करून यांनीं त्या लोकांना जवळ बोलाविलें; आणि नाना प्रकारच्या वस्तू त्यांना नजर केल्या. हें खावें, तें पांघरावें, हा जोडा पायांत घालावा, तें सलकडें हातांत घालावें, असें त्यांना होऊन गेलें. पण असें करतां करतां, जणूं काहीं अलंकारच वाटावा अशा बेतानें मॅगेलनच्या लोकांनीं त्यांच्यापैकीं काहीं लोकांच्या हातापायांत दागिन्यासारख्या दिसणाऱ्या बेड्या ठोकून टाकल्या! ज्यांना गमतीदार वस्तु मिळाल्या होत्या, ते हसत खेळत निघून गेले. त्यांच्या मागोमाग हे बेड्या ठोकलेले लोकही जाऊं लागले, तों त्यांना समजून आलें कीं, आपल्याला हलतां येत नाहीं. इतक्यांत मॅगेलन्नें आपलीं जहाजें समुद्रांत दूरवर नेलीं. अशा रीतीनें त्यांना हवे असलेले पॅटोगोनियाचे देखणे रहिवासी त्यांच्या हातांत सांपडले.

ऑगस्ट महिन्यापर्यंत या देशांतलें जें सेंट ज्यूलियन बंदर, तेथेंच मॅगेलन् राहिला; आणि मग पुन्हां एकदां दक्षिणेच्या रोखानें तो निघाला.



मधून मधून सारखा प्रतिकूल वारा भेटे; पण हा साहसी मनुष्य तसाच पुढें पुढें चालला. ऑक्टोबरच्या शेवटीं त्याचीं जहाजें केप व्हर्जिन्स येथें पोहोंचलीं. अमेरिका खंडाच्या दक्षिण टोंकांजवळील समुद्राचा मोठा नकाशा वाचकांनीं नीट पाहून ठेवला तरच त्यांना मॅगेलनच्या या साहसाची बरोबर कल्पना येईल. या ठिकाणाहून पुढें जातांना, त्याला मोठें थोरलें रुंद पाणी लागलें तेव्हां त्याला वाटलें कीं, आपल्याला पाहिजे

असलेली सामुद्रधुनी ती हीच असावी. हीच जर सामुद्रधुनी असली, तर ती संपल्याबरोबर पुढें लागणाऱ्या विशाल सागरांत म्हणजे पॅसिफिक महासागरांत ते शिरणार होते. अर्थात् पुन्हां एकदा प्रश्न येऊन पडला कीं, त्या सागरांत शिरण्याचें साहस करावें का नाहीं. मॅगेलननें सर्व कप्तानांना बोलाविलें. तेव्हां बहुतेकांनीं मत दिलें कीं, 'आपलीं जहाजें आतां जीर्ण झालीं आहेत; अन्नपाणी आणि इतर सामानसुमान संपत आलें आहे, म्हणून परत वळावें; आणि हवी असलेली सामुद्रधुनी आम्ही शोधून काढली आहे, असें प्रतिवृत्त स्पेनच्या राजाला कळवावें. पण मागल्या खेपेप्रमाणेंच याही प्रसंगीं मॅगेलननें नकार दिला. तो म्हणाला, 'मेलों तरी बेहत्तर, पण मी पुढें जाणार. भाकरी कमी पडूं लागली तर, म्यानाचें कातडें चघळीन, पण मागें फिरणार नाहीं.' तथापि ते इतर कप्तान ऐकेनात. शेवटीं सर्व अधिकार आपल्याकडे घेऊन मॅगेलननें हुकूम सोडला कीं, 'सर्वांनीं आपलीं जहाजें पश्चिमेकडे हांकारावीं. कारण इकडूनच पुढें गेलें असतां आपण शेवटीं पूर्वदिशेला जाऊन पोहोंचूं. सामुद्रधुनी शेकडों मैल लांब होती. तिच्या दुसऱ्या टोंकाला जावयास त्याला कित्येक आठवडे लागले. ती कोठें फार रुंद असे, तर कोठें फार चिंचोळी असे. आणि दोन्हीं बाजूच्या भूमीवर बर्फानें भरलेलीं पर्वतांचीं शिखरें दिसत. डाव्या बाजूची भूमि अगदींच उजाड होती. मात्र रात्रीच्या वेळीं तिच्या-वर मधून मधून जाळ झालेले दिसत. म्हणून मॅगेलन यानें या भूमीला टेराडेलफ्यूगो। अग्निभू असें नांव दिलें. वाचकाला या नांवाचें बेट दक्षिण अमेरिकेच्या दक्षिणेला सांपडेल.

नावाड्यांना उपास पडूं लागले आणि आसपासच्या प्रदेशांत चिट्-पाखरूं सुद्धां दिसत नसल्यामुळें ह्या सर्वांनाच या सफरीचा कंटाळा येऊन गेला. शेवटीं हे असंतुष्ट जीवात्मे बंड करून उठले. बंडखोरांचा पुढारी

गोमेझ नांवाचा माणूस होता. त्यांनीं आपल्या जहाजाच्या कप्तानाला कैद केलें; आणि सुकाणू गोमेझ यानें आपल्या हातीं घेतलें. रात्रीच्या वेळीं गोमेझनें आपल्या जहाजाचें तोंड परत वळविलें आणि मोठ्या जलदीनें ते लोक पूर्वेच्या रोखानें निघाले. संशोधन वगैरे कांहीं नको; आतां थेट घरचा मार्ग सुधारला पाहिजे, असें त्यांनीं ठरविलें होतें. त्यांनीं हा कारभार जरी गुपचुप केला होता तरी त्यांचें कवसाल उघडकीला आलें आणि त्यांना पकडण्यासाठीं मॅगेलननें त्यांचा पाठलाग सुरू केला. पण घराच्या ओढीनें गोमेझच्या अनुयायांनीं आपलें जहाज इतक्या वेगानें हाणलें कीं, हे लोक हातीं लागतील असें मॅगेलनला दिसेना. म्हणून तो परत वळला. आतां त्याच्यापाशीं तीनच जहाजें शिल्लक राहिलीं होतीं. कारण सांतॅगो नांवाचें एक जहाज मध्येंच कोठें तरी आपटून फुटलें होतें. तथापि बिलकुल धैर्य न सोडतां मॅगेलननें त्या सामुद्रधुनींतून पुन्हां वाटचाल चालू केली.

१५२०, नोव्हेंबरच्या २७ तारखेला, या सामुद्रधुनीच्या पश्चिम टोंकाला तो येऊन पोहोंचला आणि एका विशाल महासागराच्या दाराशीं आपण येऊन ठेपलों आहों, असें त्याला दिसून आलें. हीच वाट शोधून काढण्यासाठीं राजानें त्याला इकडे धाडलेलें होतें. धैर्य धरून आपण हें काम यशस्वी करून दाखविलें. यामुळें मॅगेलनला आणि त्याच्या बरोबरच्या लोकांना पराकाष्ठेचा आनंद झाला. त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. पुढें दिसणारा सागर अतिशय गंभीर आणि शांत असा दिसला. म्हणून त्यानें या सागराला 'पॅसिफिक' म्हणजे 'प्रशान्त महासागर' असें नांव दिलें. आणि ज्या ठिकाणाहून त्याला त्याचें हें धीर गंभीर रूप दिसलें त्या ठिकाणाला त्यानें **कॅपो डेझिडरेटो** असें नांव दिलें.

कोलंबसाच्या काळानंतर एवढा नवा शोध दुसऱ्या कोणी लावलेलाच नव्हता. अटलांटिक महासागर ओलांडून कोलंबस हा अमेरिकेंत येऊन

पोहोंचला, तेव्हां मानवी कर्तृत्वाची आणि साहसाची केवळ सीमा झाली, असें लोकांना वाटलें. पण या खंडाचा दक्षिण किनारा खालीं खालीं जातांना जेव्हां त्यांनीं पाहिला, तेव्हां हा कोठें तरी संपत असला पाहिजे; आणि त्याला वळसा घातला तर, पलीकडच्या समुद्रांत आपल्याला जातां येईल अशी अंधूक आशा अनेक साहसी खलाशांच्या मनांत वागत असे. ही आशा मॅगेलन यानें सफळ करून दाखविली. आफ्रिकेच्या किनाऱ्याला वळसा घालून हिन्दी महासागरांत उतरणें हें जर एकपट अवघड असलें, तर दक्षिण अमेरिकेच्या दक्षिण टोंकाला वळसा घालून पॅसिफिक्मध्यें उतरणें हें दसपट अवघड होतें. हिंदी महासागरांत असलेल्या निरनिराळ्या भूविशेषांची माहिती युरोपांत पुष्कळ लोकांना आधींच झालेली होती. फक्त आफ्रिकेला वळसण्याचें काम कोणी केलेलें नव्हतें. शिवाय आफ्रिकेचें दक्षिण टोंक हें शीत कटिबंधाच्या फारसें जवळ गेलेलें नव्हतें. अमेरिकेच्या पलीकडे एक महासागर आहे एवढा शोध बाल्बोआ यानें आधीं लावला होता. पण या समुद्रांत कोणचे भूविशेष आहेत, हा दर्या किती मोठा आहे, याला वाट कोणीकडून आहे आणि अमेरिकेचें दक्षिण टोंक शीत कटिबंधाकडे कोठपर्यंत गेलें आहे याची माहिती कोणालाही नव्हती. असा हा अज्ञात परगणा मॅगेलन यानें जगाला खुला करून दिला, हें त्याचें स्वतंत्र वैभव होय.

पण मॅगेलन् येवढ्यावरच थांबला नाहीं. राजानें सांगितलेलें काम आपण बजावलें आहे, तर आतां परत फिरावें, असें त्याचे मित्र म्हणूं लागले. पण तो म्हणाला कीं, ‘ तुम्हीं म्हणतां हें खरें आहे. पण आपल्या समोर दिसणारा हा प्रचंड महासागर आपण ओलांडलाच पाहिजे. हें पुढें वाढून ठेविलेलें काम अर्धवट टाकून जाणें बरोबर नाहीं. आपण असेच पुढें पुढें गेलों, तर शेवटीं आपण मसाल्याच्या बेटांना पोहोंचूं. हिंदी

महासागरांत जाऊं आणि तेथून आफ्रिकेला वळसा घालून अटलांटिकमध्यें शिरून परत आपल्या देशीं जाऊं.' त्याच्या या आकांक्षेचा पल्ला आणि त्याला झालेलें साहसाचें स्फुरण याची कल्पनाच बरोबरच्या लोकांना येईना! ते केवळ स्तिमित होऊन त्याच्याकडे पाहूं लागले. त्यांनीं आपलीं जहाजें त्याच्या आज्ञेप्रमाणें पश्चिमेकडे हांकारलीं.

वाटेच्या श्रमानें बरोबरचे किती तरी लोक मेले. त्यांनीं पकडलेल्या त्या धिप्पाड लोकांच्यापैकींही एक माणूस मेला. उरलेल्या लोकांच्या हातून वल्हवण्याचें कामसुद्धा आतां नीट होईनासें झालें. पण त्यांतल्या त्यांत एक गोष्ट बरी होती. समुद्र अगदीं शांत होता. तीन महिने आणि वीस दिवस-पर्यंत वर आकाश आणि खालीं पाणी असा त्यांचा प्रवास चालला होता! जवळचें सर्व अन्न संपून गेलें, तेव्हां त्याचा खालीं सांठलेला भुगासुद्धां त्यांनीं खाल्ला. जहाजावरचें गोडें पाणी नासलें आणि पिवळें दिसूं लागलें. जहाजाच्या दोरखंडांना मधून मधून कातड्याचीं वेष्टणें असत; तीं कापून काढून, अक्षरशः त्यांनीं चघळून खाऊन टाकलीं! अशा रीतीनें मॅगेलन्‌नें केलेलें दुर्दैवी भाकित खरें ठरलें!

१५२१ च्या मार्च महिन्याच्या ६ व्या तारखेला या खलाशांच्या आसावलेल्या डोळ्यांना जमीन दिसली. पॅसिफिक् महासागरांत लॅड्रोनस् या नांवानें जीं लहान लहान बेटें मोडतात, तीच ती भूमि होय. मॅगेलन येथें उतरला. तेव्हां दिसून आलें कीं, बेटावरचे लोक अतिशय चोरटे आहेत. म्हणूनच त्यानें या बेटांना चोरांचीं बेटें अथवा लॅड्रोन्स असें नाव दिलें. चोरट्यांना शिक्षा करावी म्हणून त्यानें त्यांच्यावर बाण सोडले; पण हे चोरटे असे खमंग कीं, अंगांत घुसलेले बाण, ते हुसकून बाहेर काढीत आणि बाहेर वहात असलेल्या रक्ताकडे बघत बसत. जखमेच्या दुःखापेक्षां त्यांना या शस्त्राचेंच मोठें आश्चर्य वाटूं लागलें! या बेटावर

या खलाशांना नाना तऱ्हेचीं फळें खूप सांपडलीं आणि समुद्राच्या कांठीं चांगले मासेही धरतां आले. उपासमारीनें गांजलेल्या या लोकांना हें खाऊं कां तें खाऊं असें झालें. थोडे दिवसपर्यंत सुग्रास अन्न खात ते तेथें राहिले आणि स्वस्थ पडून त्यांनीं झोपाही काढल्या.

सफर पुन्हां सुरू झाली; आणि मार्चच्या १६ तारखेला ते दुसऱ्या एका मोठ्या बेटाला येऊन लागले. ज्यांना आपण सध्यां फिलिपाइन्स् बेटें म्हणतों, त्याच द्वीपसमूहांत मॅगेलन आलेला होता. आपण केवढें महत् कृत्य केलेलें आहे, याची कल्पना त्याला स्वतःलाच या ठिकाणीं आली. कारण या बेटांवर आशिया खंडांतील अनेक व्यापारी जहाजें आहेत आणि मसाल्याचीं बेटेंही याच्या आसपासच आहेत, असें त्याला येथें कळलें. ज्या मोल्यूकाज बेटांविषयीं त्यांनीं इतकें ऐकलें होतें, त्याच्यापासून उत्तरेस कांहीं अंतरावर तो येऊन लागलेला होता. पण मोल्यूकाजकडे जावें असें आतां त्याला वाटेच ना. कारण हीं लहान मोठीं बेटें म्हणजे मसाले आणि सोनें यांचें एक आगरच होतें.

या ठिकाणीं मॅगेलनच्या हातून एक चूक झाली. अटलांटिक महासागरांत शिरतांना केवळ हिंदुस्थानाला पोहोंचणारा एक नवा मार्ग शोधून काढणें येवढाच कोलंबसाचा हेतु नव्हता, तो मनांत म्हणत असें कीं, हा मार्ग शोधून काढीन, रगड पैसा जमा करीन, आणि मोठालीं सैन्यें तयार करून, जेरुसलेम नगरी मुसलमानांच्या हातून सोडवीन. म्हणजे धर्माची बाब त्याच्या मनाच्या तळाशीं कोठें तरी होती. मॅगेलनच्या मनांत सुद्धां अशी एक धार्मिक वासना असे कीं नवी भूमि सांपडली तर तेथील लोकांना ख्रिस्ती करावें. झेबू बेटावरील लोकांशीं या पाहुण्यांचें दळणवळण पहिल्यानें सुरू झालें. एका अरब दुभाष्याच्या द्वारां मॅगेलननें या लोकांची मर्जी संपादन केली. पुढें या लोकांना कळलें कीं, हिंदुस्थानांत

ज्या पोर्तुगीज लोकांनीं येवढे पराक्रम केले आहेत आणि त्या देशाच्या पश्चिम किनाऱ्यावर ठिकठिकाणीं आपलीं ठाणीं घातलीं आहेत, त्या देशाच्या शेजारच्याच देशांत राहणारे हे लोक आहेत. बोलणें चालणें होतां होतां, झेबू बेटाचा राजा सुद्धां खिस्ती धर्म स्वीकारण्यास तयार झाला. राजाच्या बरोबर अनेक प्रजाजनांनीं खिस्ती धर्म स्वीकारला. या कामीं आलेल्या पाहुण्यांनीं या लोकांचें मन कसें वळवलें याची अटकळ करतां येत नाहीं. पण अंदाज असा आहे कीं, बहुधा जबरदस्तीचा प्रयोग झाला असावा. राजा आणि प्रजा असे शब्द योजले तरी, सारे लोक रानटीच होते ! झेबू बेटांत हा विजय मिळविल्यावर मॅगेलन हा माथन् बेटांत गेला आणि तेथील राजाला त्यानें धर्मांतराचा हुकूम केला. राजा हें मान्य करीना. म्हणून पाहुण्यांनीं राजाशीं कडाक्याचें युद्ध सुरूं केलें. बेटावरचे लोक चांगले शूर होते. त्यांनीं या स्पॅनिश लोकांचा पराभव केला. स्वभावांतला हट्टीपणा मॅगेलन् याला येथें नडला. आपले पराभूत सैनिक रणावरून पळत आहेत असें दिसलें तरी मॅगेलन् जागचा हलेना. शत्रूंनीं त्याच्यावर झडप घातली आणि त्यांच्या आघातांनीं घायाळ होऊन मॅगेलन् ताबडतोब मरण पावला. त्या रानटांनीं त्याचें प्रेत सुद्धां या खलाशांच्या हातीं लागूं दिलें नाहीं. या शूर आणि निर्भय माणसाचा अंत अशा रीतीनें झाला. ही गोष्ट १५२१, एप्रिल २७ रोजीं झाली.

खलाशांनीं आपले पुढारी म्हणून मॅगेलन्च्या दोन दुय्यमांना निवडलें आणि आतां पुढें काय करावयाचें याचा विचार ते करूं लागले. इतक्यांत झेबू बेटांतून खिस्ति झालेल्या राजाकडून या लोकांना जेवणाचें आमंत्रण आलें. आमंत्रण करणाऱ्यानें सांगितलें कीं, ‘ आपण फार थोर लोक आहां. आपल्या उपदेशाप्रमाणें आम्हीं खिस्ती झालों आहों. आपल्याला मेजवानी द्यावी असा राजेसाहेबांचा हेतु आहे.’ पाहुणे मंडळी

आमंत्रणानें खूष झाली. खरी गोष्ट अशी होती कीं, आपल्याला धर्मांतर करावें लागलें, ही गोष्ट त्या राजाच्या मनाला लागून राहिली होती आणि माथन् बेटांतील लोकांनीं या स्पॅनिश् लोकांचा पराभव करून त्यांच्या नायकालाही ठार मारलें आहे, हें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें होतें. आपणही असेंच कांहीं करावें अशा हेतूनें त्यानें आमंत्रण रवाना केलें होतें. जेवणाच्या वेळीं पाहुणे मंडळी झेबू बेटावर जमा झाली. तों इतक्यांत आजूबाजूला दडून बसलेले लोक त्यांच्यावर वेगानें तुटून पडले. उडालेल्या चकमकींत स्पॅनिश लोकांचे हे नवे अंमलदार आणि कांहीं खलाशी मरण पावले. उरलेल्या लोकांनीं विचार केला कीं, आतां जहाजांवर पळून जाण्यांतच शहाणपणा आहे. ते जहाजांवर येऊन पोहोंचले आणि क्षणभरही न थांबतां त्यांनीं आपलीं जहाजें हांकारलीं.

बोर्निओ बेटाला जाऊन तेथून ते मोल्यूकाजला गेले. याच बेटाचें नांव मसाल्याचें बेट म्हणून सगळ्या युरोपांत दुमदुमत राहिलें होतें. तेथें त्यांनीं मसाल्याच्या गोण्याच्या गोण्या जहाजावर भरल्या आणि केप ऑफ गुडहोप्च्या रोखानें ते हिंदी महासागरांतून निघाले. त्यांचा अंदाज चुकला आणि या भूशिराला ते लागलेच नाहींत. पण आफ्रिकेला वळसा घालून ते उत्तरेकडे वळले. त्यांनीं केलेल्या पराक्रमाची वार्ता कांहीं पोर्तुगीज लोकांच्या कानीं गेलेली होती. मत्सरानें प्रेरित होऊन त्यांनीं या लोकांना गांठले आणि कांहींजणांना कैद केलें. उरलेल्यांनीं जहाजें जोरानें हांकारलीं आणि १९२२ च्या सप्टेंबरच्या ६ तारखेस ते स्पेन देशाला येऊन पोहोंचले. सुमारें तीन वर्षेंपर्यंत हे लोक समुद्रावर हिंडत होते. मॅगेलन मेला, कांहीं खलाशांचीही वाताहत झाली, हें सारें खरें; पण एक गोष्ट सिद्ध झाली कीं, स्पेन देशांतून पश्चिमेच्या बाजूनें बाहेर पडलेले हे लोक सारखे पश्चिमेकडे जातां जातां शेवटीं पूर्वेच्या बाजूनें

स्वदेशाला परत आले. म्हणजे पश्चिमेला गेलें असतांना आपण पूर्वेकडील हिंदुस्थानाला जाऊन पोहोंचूं हा कोलंबसानें केलेला अंदाज मॅगेलनच्या या साहसानें खरा ठरला. जहाजें परत आल्यावर स्पेनच्या राजानें या खलाशांचें मोठेंच कौतुक केलें असेल, हें सांगण्याची आवश्यकताच नाहीं! सर्व देशभर हा एकच विषय होऊन राहिला आणि एक नवें भौगोलिक प्रमेय प्रत्यक्ष खरें करून दाखवल्याचा मान ज्या धाडसी तांडेलाच्या द्वारां स्पेन देशाला प्राप्त झाला, त्याचें-मॅगेलनचें-नांव लौकरच सर्वतोमुखीं झालें.

मॅगेलन् यानें धर्मप्रसाराचाही हेतु मनांत धरला होता हें जरी खरें असलें, तरी त्यानें दाखविलेलें शौर्य आणि केलेलें साहस यांची किंमत बिलकुल कमी होत नाहीं. कोलंबसापेक्षांही याचें साहस मोठें होतें. जमिनीचें दर्शनही न होतां सतत तीन महिने वीस दिवसपर्यंत हा तांडेल पाण्यावर फिरत राहिलेला होता. पॅसिफिक् महासागरासारखा अफाट सागर सामान्य प्रतीच्या जहाजांत बसून ओलांडून जाणें ही गोष्ट केवळ अद्भुतच होती. त्याप्रमाणेंच टेराडेलफ्यूगोजवळच्या सामुद्रधुनींत शिरणें आणि पश्चिमेच्या टोंकाकडून बाहेर पडणें हें सुद्धां एक मनस्वी साहसच होतें. विरोधकांचा निकाल लावण्याच्या कामीं मॅगेलन् हा क्रूरपणानें वागला हें खरें. पण त्याला पुढें मिळालेलें यश लक्षांत घेतलें म्हणजे मानवी प्रगतीच्या दृष्टीनें त्यानें हा वाईटपणा घेतला हें बरें झालें, असेंच म्हणावें लागतें.

---

# फ्रॅन्सिस् ड्रेक

## दुसरी पृथ्वी प्रदक्षिणा

इंग्लंड देशांत किती तरी शूर दर्यावर्दी आजवर उत्पन्न झाले आहेत. पण एलिझाबेथच्या कारकीर्दीत प्रसिद्धी पावलेल्या ड्रेकचें नांव लोकांच्या तोंडीं अजूनही कायम आहे. या राणीच्या कारकीर्दीत जीविताच्या प्रत्येक शाखेंत इंग्लंड पुढें पुढें सरसावत चाललेलें होतें. पण इतर कोणत्याही अंगापेक्षां समुद्रावरील साहसाच्या बाबतींत इंग्लंडच्या लोकांनीं या वेळीं अगदीं कळस केला. इंग्लंडच्या आधीं, पोर्तुगाल आणि स्पेन या देशांच्या नावाड्यांनीं फार मोठीं साहसें केलीं होतीं. कोलंबसानें अमेरिका खंड शोधून काढलें होतें आणि मॅगेलन् यानें पृथ्वीची पहिली प्रदक्षिणा केलेली होती. हें सारें श्रेय स्पेनच्या राजानें संपादून घेतलें होतें. एलिझाबेथ राणीलाही वाटूं लागलें कीं, आपल्या नावाड्यांना असेंच प्रोत्साहन द्यावें; आणि तें दिलें तर, तेही अशींच मोठमोठालीं कामें करून दाखवितील. या वेळेपर्यंत अटलांटिक महासागरांतील कित्येक बेटांवर आणि अमेरिकेच्या पूर्व व पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांत स्पॅनिश लोकांनीं आपलीं ठाणीं घातलीं होतीं; आणि अमेरिकेच्या कित्येक देशांत प्रवेश केला होता.

इकडे हिंदीमहासागरांत प्रवास करून पोर्तुगीज लोक हिंदुस्थानपर्यंत येऊन पोहोंचलेले होते व मसाल्याच्या बेटांशीं त्यांचा व्यापार चालू झालेला होता. म्हणजे साहसांत यश मिळवून, या सर्व समुद्रांत स्पॅनिश व पोर्तुगीज लोकांनीं आपले व्यवहार सुरळीत चालूं केले होते; आणि कोणी भामटे आपल्या अंगावर अचानक येऊन कोसळतील अशी दुर्ध्याची अवस्था शिल्लक राहिली आहे असेंही त्यांना वाटत नव्हतें. युरोपियन राजकारणांत मात्र, इंग्लंडचें आणि स्पेनचें सनातन वैर चालूंच होतें. अर्थातच समुद्रा-वरही कोठें कोठें स्पॅनिश नावाड्यांच्या हातचा मार इंग्रज नावाड्यांना खावा लागत असे. एलिझाबेथ राणीला या गोष्टीचा मोठा विषाद वाटे. आणि पोर्तुगीजांना आणि स्पॅनिश लोकांना शासन करणारा कोणी तरी शूर नावाडी आपल्या देशांत निघाला पाहिजे असें तिला वाटे. हा शूर नावाडी म्हणजेच फ्रान्सिस ड्रेक होय.

ड्रेकनें समुद्रावर अनेक सफरी केलेल्या होत्या आणि जर स्पेन देशाशीं आपलें वैरच आहे, तर त्याच्या जहाजांची वाटमारी करण्यांत कांहींच चूक नाहीं, अशी त्याची समजूत होती. स्पॅनिश जहाजांवर त्यानें घातलेल्या दरोड्यांच्या हकीकती देशांत येऊन पोहोंचल्या म्हणजे इंग्रज लोक मोठे खुलून जात आणि राणीलाही ड्रेकचें मोठें कौतुक वाटे. होतां होतां ड्रेकची साहसाची कल्पना वाढत चालली आणि अटलांटिक महासागरांत व जमलें तर पॅसिफिकमध्यें शिरूनही वाटमारी करावयाची, तर ‘ आपण माझी सर्व सिद्धता करून दिली पाहिजे ’ अशी भुणभुण त्यानें राणीच्या मागें लावली होती. दरबारचे कांहीं मुत्सद्दी असल्या कामाच्या विरुद्ध होते. राणीलाही एकदा वाटे कीं, ड्रेकला समुद्रावर पाठवावें. पण पुन्हा तिचें मन पालटे, आणि आपण या उद्योगांत पडूं नये, असेंही ती म्हणे. ड्रेकला वाट पाहण्यापलीकडे कांहींच करतां येत नव्हतें. शेवटीं एकदांची

राणीसाहेबांची मर्जी निश्चितपणें वळली आणि ड्रेकनें स्वारीवर निघावें असें ठरलें.

स्पॅनिश नावाड्यांवर सूड कसा उगवतां येईल याच्या वाटाघाटी अनेक दिवसपर्यंत झाल्या आणि कांहीं योजनाही निश्चित ठरल्या. ड्रेकच्या हातीं सहा सुसज्ज जहाजें देण्यांत आलीं आणि यांत सर्वांत मोठें जहाज जें पेलिकन् त्यावर ड्रेकचें निशाण लागलें. जहाजावरील किती तरी लोकांना हें माहीत नव्हतें कीं, आपल्याला स्पॅनिश समुद्रांत आणि दक्षिण सागराकडे जावयाचें आहे. त्यांना असें सांगितलें होतें कीं, आपण सर्वजण इजिप्त देशांतील अलेक्झँड्रिया बंदराकडे चाललों आहोंत. बरोबर आलेल्या लोकांत डाऊटी आणि व्हर्ले असे दोघे विरोधी इसम होते. पहिल्यापासून त्यांचें म्हणणें असें होतें कीं, हें सफरीचें काम हातीं घेऊं नये. पण राणीसाहेबांची मर्जी संपादून ड्रेकनें हा बनाव घडवून आणला. त्यामुळें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. शेवटीं त्यांनीं असा बेत केला कीं, ड्रेकच्या स्वारींत जावें आणि जमेल तेथें तेथें त्याला उपद्रव द्यावा. डाऊटी-बरोबर त्याचा भाऊ जॉन् हाही होता.

१५७० नोव्हेंबर १५ तारखेला हा काफिला प्लिमाऊथ बंदरांतून निघाला. आपल्यापुढें पुष्कळच संकटें वाढून ठेवलीं आहेत हें ड्रेकला दिसतच होतें. परंतु त्या संकटांतून निभावून गेलों तर दिगंत कीर्ति होईल या आकांक्षेनें तो भारून गेला होता. राणीसाहेबांनीं त्याची उत्तम तरतूद करून दिली होती. त्यांनीं त्याला जेवावयाला चांदीचीं ताटें दिलीं होतीं. जहाजें सुरू होईपर्यंतचा काळ मजेनें जावा, म्हणून गायिकांचे तांफेही त्याच्या सेवेला दिलेले होते; आणि जहाजावरील त्याचा दिवाणखाना नेहमीं सुगंधित रहावा म्हणून राणीसाहेबांनीं त्याला अत्तराच्या कुप्या पाठविल्या होत्या.

ड्रेक समुद्रांत शिरतो तों एक वादळ झालें. जहाजाची कांहीं मोडतोड झाली. दुरुस्तीसाठीं त्याला पुन्हां परत यावें लागलें. सर्व नीटनेटकें होऊन तो निघाला आणि ब्लॅक भूशिरावर त्यानें पहिला मुक्काम केला. हें ध्यानांत हवें कीं, घरांतून बाहेर पडतांना आपण पृथ्वी-प्रदक्षिणेला निघालों आहों, अशी ड्रेकची कल्पना नव्हती. स्पॅनिअर्ड लोकांना ठिकठिकाणीं गांठावें, गांठून झोडपावें, झोडपून त्यांच्यापाशीं असलेली सारी चीजवस्त हिसकावून घ्यावी व अशा रीतीनें स्पेनच्या राजाचें नाक कापावें हा त्याचा मुख्य हेतु होता. भर समुद्रावर एक तऱ्हेची दरोडेखोरी करावयास आपण चाललों आहों, हें त्याला पक्कें माहीत होतें. पण या दरोडेखोरीला राणी-साहेबांची संमति होती; आणि सरसकट जनतेचें कौतुकाचें पाठबळ होतें. तेथून निघून तो सान्तॅगोकडे गेला. वाटेनें जातांना एका पोर्तुगीज जहाजावर त्यानें झडप घातली आणि तें हस्तगत करून डाऊटी बंधूंच्या ताब्यांत दिलें. त्यांच्याच हाताखालीं त्यानें आपला स्वतःचा भाऊ जॉन याला ठेवलें होतें. या जहाजाच्या लुटींत त्याला खूप दारू, रेशमी कापडाचे तागे आणि मसाल्याच्या गोण्या सांपडल्या.

सान्तॅगोवरून तो ब्राव्होकडे निघाला. वाटेनें डाऊटी म्हणूं लागला कीं, “ तांडेलसाहेबांचा भाऊ जॉन हा चोरटा आहे. यानें खजिन्यांतील कित्येक वस्तु लांबविलेल्या आहेत. ” जॉननें या आरोपाचा इन्कार केला; आणि उलट ‘ डाऊटी हाच चोर आहे ’ असें तो म्हणूं लागला. शेवटीं तांडेलानें तपास करविला तेव्हां दिसून आलें कीं, जॉनकडे कसलाही दोष नसून, उलट डाऊटीनेंच खजिन्यांतील वस्तू लांबविल्या आहेत. फ्रॅन्सिस् ड्रेक रागानें बेहोष झाला आणि डाऊटीला म्हणाला, “ तुझ्या मनांत जहाजावर कांहीं तरी भानगडी करावयाच्या आहेत; पण याद धरून रहा. तुझा जीव घेतल्याखेरीज राहणार नाहीं.”

ड्रेकचा काफिला ब्राझिलच्या रोखानें निघाला तो ५ एप्रिलला त्या देशाच्या किनाऱ्याला जाऊन लागला. तेथें डाऊटीसंबंधानें पुन्हां तक्रार झाली. तेव्हां त्यानें या बदमाशाला शिडाला करकचून बांधून ठेवलें. पण इतकें झालें तरी त्याचा वाह्यातपणा चालूंच होता. पुढील प्रवासांत मोठमोठालीं वादळें झालीं. त्यांतून निभावून ड्रेकनें आपला काफिला टेराडेल-फ्यूगोच्या सामुद्रधुनीपाशीं आणला. तेथें ड्रेक जमिनीवर उतरला; अशासाठीं कीं, कांहीं थोडी विश्रांति मिळावी. पण तेथें तद्देशीय लोकांशीं त्याचें असें कडावयाचें भांडण जुंपलें कीं, जहाजावर पळून येणें त्याला भागच पडलें. इकडे डाऊटीचा उपद्रव चालूंच होता. आपण ड्रेकच्या या मोहिमेला इंग्लंडांत असतांना कसा विरोध केला हेंही तो खलाशी-मित्रांना मोठ्या ऐटीनें सांगूं लागला. हा पुरावा हातीं पडतांच ड्रेकचें पित्त खवळलें; आणि त्यानें डाऊटीला फांशीची शिक्षा फर्मावली. ठोकळ्यावर मान ठेवण्याच्या पूर्वी डाऊटी ड्रेकला दोन्ही हातांनीं भेटला आणि म्हणाला, "तुझ्याशीं माझें कसलेंच भांडण नाहीं." त्याच्या मानेवर कुऱ्हाड पडली आणि ड्रेक ओरडून म्हणाला, "हें पहा, बदमाषांचा शेवट असा होतो." ड्रेकचें हें कृत्य अघोरीच होतें असें वाटेल; पण जर मोहीम यशस्वी व्हावयास हवी होती तर विरोधी आणि कपटी लोकांचा नायनाट करणें हें ड्रेकला प्राप्तच होतें.

१५७८ ऑगस्टच्या २० तारखेला ड्रेक हा मॅगेलन सामुद्रधुनींत शिरला. दोन्ही बाजूंच्या डोंगरांच्या माथ्यावर बर्फाचीं आवरणें पडलेलीं होतीं आणि समोरून अतिशय गार वारा येत होता. पाण्याच्या लाटाही समोरून त्यांच्या अंगावर घोंघावत येत होत्या. ड्रेकला स्वच्छ दिसूं लागलें कीं, पुढें गेलों तर मोठा धोका आहे. पंधरा दिवसपर्यंत या लाटांशीं झुंज करून शेवटीं ड्रेकचा काफिला पॅसिफिक महासागरांत उतरला.

मॅगेलन्नें या महासागराला पॅसिफिक म्हणजे ‘ प्रशान्त ’ महासागर असें नांव दिलें होतें. पण ड्रेकला त्या सागराचा प्रशान्तपणा कोठेंच दिसेना. प्रचंड वादळ सुरूं झालें आणि त्याच्या काफिल्यांतील जहाजें एकमेकांपासून दूर हेलपाटत गेलीं. बाकीच्या जहाजांवरचे तांडेल घाबरून गेले; आणि ड्रेकची संमति न घेतां परत सुकाणूं वळवून त्यांनीं घरचा रस्ता सुधारला ! पॅसिफिक् महासागरांत आतां ड्रेक एकटा राहिला. टोले खात खात त्याचें जहाज दक्षिणेच्या बाजूला केप हॉर्न येथें येऊन लागलें. दक्षिण अमेरिकेच्या अगदीं दक्षिण टोंकाला टेराडेलफ्यूगो या नांवाचा एक द्वीपसमूह वाचकांना सांपडेल. याच्या अगदीं दक्षिणेच्या टोंकाला केप हॉर्न आहे. येथें ड्रेक जमिनीवर उतरला आणि दोन्ही हात पसरून तो जमिनीवर पालथा पडला व म्हणाला, “ या अमेरिकन भूमीच्या अगदीं शेवटच्या शेवटच्या टोंकाला मी येऊन लागलों आहें. ”

हळूंहळूं वादळ शांत झालें आणि उत्तरेच्या रोखानें निघून ड्रेक् चिली देशाच्या किनाऱ्यानें वर चालला. जातां जातां तो मोचा नांवाच्या बेटाला लागला. तेथें त्याला कळलें कीं, व्हालपॅरेझो बंदरांत एक मोठें स्पॅनिश जहाज नांगर टाकून स्वस्थ आहे. चिली देशाची जी उभी पट्टी आहे तिच्या मध्याच्या सुमारास हें बंदर वाचकांना सांपडेल. या जहाजावर झडप घालावयाची ठरवून ड्रेक वेगानें निघाला आणि बंदराच्या तोंडाशीं येऊन ठेपला. जहाजावरील लोकांना वाटलें कीं, हा आपल्यापैकींच कोणी असावा. म्हणून त्यांनीं स्वागताचीं शिंगें फुंकलीं आणि मोठ्या स्वादिष्ट चिली दारूनें आपले पेले भरले. पण इतक्यांत पाहतात तों, हातांत सुरे घेतलेले आणि तलवारी लटकावलेले शे-सवाशें गुंड आपल्या जहाजांवर चालून येत आहेत. स्पॅनिश अधिकाऱ्यांना याचा कांहीं अर्थच कळेना. हां हां म्हणतां हे हल्लेवाले त्यांच्या जहाजांवर चढले आणि त्यांनीं कापाकापीला

सुरवात केली. बहुतेक सर्व लोक उड्या टाकून निसटून गेले आणि त्यांनीं बंदरांत आरडाओरडा सुरू केला कीं, पिसाळलेले इंग्रज दक्षिण समुद्रांतून येऊन आपल्या बंदरांत शिरले आहेत. एकदम पळापळ सुरू झाली आणि आपले खलाशी शिपाई बरोबर घेऊन ड्रेक बंदरांत शिरला; आणि तेथून जवळच असलेल्या सान्तॅगो शहरांतही गेला. तेथें त्याला चिट्पाखरूंही दिसलें नाहीं. मात्र दारूनें भरलेलीं पिपें, चांदीचीं भांडीं, शिसवीचें लाकूड इत्यादि अनेक मोलवान पदार्थ सांपडले. ही लूट घेऊन बंदरांत असलेल्या त्या स्पॅनिश जहाजाकडे तो आला. तें जहाजही त्यानें सगळेंच्या सगळें लुटलें. एक लक्ष पौंड किंमतीची लूट सांपडल्यामुळें ड्रेकला मोठा हर्ष झाला.

येथून उत्तरेकडे जातां जातां त्याला वाटेनें अनेक स्पॅनिश जहाजें भेटलीं. त्यांच्यावर अचानक झडप घालून, पुढें तो अरिका बंदरावर आला. चिली देशाच्या उत्तर टोंकाला हें बंदर आहे. या बंदरांत अनेक स्पॅनिश जहाजें नांगरून पडलेलीं होतीं आणि खलाशी लोक गांवांत गेले होते. अचानक घाला घालून ड्रेकनें या जहाजांचीही लूटमार केली. येथून पुढें तो लिमा येथें गेला. हें लिमा बंदर पेरू देशाच्या सरासरी मध्यावर वाचकांना सांपडेल. येथें असलेलीं स्पॅनिश जहाजें सोन्यानें गडगंज भरलेलीं होतीं. ही लूट हस्तगत करून तो पनामाला गेला. तेथेंही त्यानें अशीच मोठी लूट मिळवली.

वास्तविक पाहतां, ड्रेकनें चालवलेल्या या लूटमारीशीं आपल्याला कांहींच करावयाचें नाहीं. पण या लुटीच्या आशेनें वर जातां जातां शेवटीं पृथ्वी-प्रदक्षिणेच्या एका मोठ्या साहसाला तो प्रवृत्त झाला, हेंच आपल्याला दाखवावयाचें आहे. काका फ्यूगो या जहाजाच्या लुटीनें तर ड्रेकला आतां संपत्ति नकोशी झाली! म्हणून पुढें पनामा येथें लुटालूट न

करतां, तो **कॅनो बेटांकडे** वर गेला. येथें पोहोंचल्यावर पश्चिमेच्या बाजूनें निरनिराळ्या वार्ता त्याच्या कानावर येऊन ठेपल्या. आणि लुटालुटीची त्याची कल्पना जरी अजून कायमच होती तरी, उत्तरेच्या बाजूनें जातां येईल तितकें वर जाऊन, भर पॅसिफिकमध्यें आपण शिरावें असें त्याला वाटूं लागलें. **निकाराग्वा, मेक्सिको** व **कॅलिफोर्निया** यांच्या शेजारून वर जातां जातां **सॅन् फ्रान्सिस्को** जवळच्या एका लहानशा बंदराजवळ तो येऊन पोहोंचला. आतां उत्तरेकडे न जातां पश्चिमेला पसरलेल्या पॅसिफिकमध्यें उतरण्याचा निश्चय त्यानें केला. या देशाला त्यानें **न्यू अल्बियन** असें नांव दिलें आणि कांहीं दिवसपर्यंत येथें तो मोठ्या डामडौलानें राहिला. जवळ वाटेल तेवढी लूट सांठलेली होती; दारूही यथेच्छ होती; आणि सोन्या-चांदीचीं भांडींहि होतीं. शेवटीं हा कोणी अवतारी पुरुष आहे, असें समजून भोंवतालच्या लोकांनीं त्याला राज्याभिषेक सुद्धां केला!

आपलें स्वतःचें जहाज व लुटींत धरलेलीं जहाजें दुरुस्त करून घेऊन तो पॅसिफिकमध्यें शिरला. तब्बल दोन महिने त्याला जमिनीचें दर्शनही झालें नाहीं. ड्रेक जर नुसताच लूटमारी करणारा असता तर त्याच्यानें हें साहस होतें ना. नोव्हेंबर १४ ला तो **मोल्यूकाज** बेटावर आला. तेथील राजाशीं तह करून तो **सेलिव्हीज** बेटावर आला. न्यू गिनी या नांवाचें जें एक मोठें बेट पूर्व पॅसिफिकमध्यें आहे, त्याच्या जवळच पश्चिमेला **मोल्युकाज** नांवाचा द्वीपसमूह आहे आणि फिलिपाइन्स बेटांच्या दक्षिणेला **सेलीबीज** या नांवाचा द्वीपसमूह आहे. या टापूंत आल्यावर ड्रेक याला वाटेल तितका मसाला आपल्या जहाजांवर भरून घेतां आला. आतांपर्यंत त्याचीं जहाजें सोन्याचांदीच्या आणि दारूच्या लुटीनें भरलेलीं होतीं. आतां तीं मसाल्याच्या गोण्यांनीं भरून गेलीं. झालेल्या कामानें संतुष्ट होऊन ड्रेक हिंदी महासागरांत शिरला आणि थेट केप ऑफ् गुड्

होपकडे निघाला. आफ्रिकेला वळसा घालून लहान मोठे मुक्काम वाटेंत करीत तो इंग्लंडच्या नजीक येऊन ठेपला. प्लि माऊथ बंदरांतून तो बाहेर पडला त्याला आतां तीन वर्षें होऊन गेलीं होतीं. १५८० च्या सप्टें-बरांत किंवा ऑक्टोबरांत तो इंग्लंडच्या किनाऱ्याला येऊन लागला.

तेथें त्याच्या मित्रांनीं येऊन सांगितलें कीं, तुला थोडें जपूनच वागा-वयास हवें. स्पॅनिश जहाजांची तूं इतकी लूटमार केली आहेस कीं, स्पेन देशचा इथला वकील राणीच्या दरबारांत तुझ्या नांवानें सारखी हांकाटी करीत आहे. या उपदेशाप्रमाणें ड्रेक कांहीं दिवस तसाच जहाजावर बसून राहिला आणि मग त्यानें राणीसरकारांना एक गुप्त संदेश धाडला. त्यांनींही 'आतां येऊन भेटावें' असें कळविलें. राणीसरकारला कसें भेटावें हें ड्रेकला चांगलें माहीत होतें. लुबाडून आणलेल्या लुटींतील कांहीं कांहीं शेलक्या चिजा त्यानें राणीसाहेबांना नजर म्हणून पुढें पाठ-वून दिल्या. अशा रीतीनें त्यांची मर्जी अगाऊच संपादन करून ड्रेक त्यांच्या दर्शनास आला.

आतां स्पॅनिश वकिलाच्या ओरड्याकडे कोण लक्ष देणार! त्याची ती लूट पाहून राणीसरकार दिपून गेल्या. ड्रेकनें आपला वांटा उचलला. राणीसरकारांनींही आपला उचलला; आणि मग ड्रेकच्या नांवाचा जयजयकार सर्व इंग्लंडांत सुरू झाला. राणीसाहेब आपल्या लवाजम्या-निशीं जहाजावर येऊन त्याला भेटल्या आणि त्यानें जेव्हां गुडघे टेकून मान लवविली, तेव्हां त्या खुशींत येऊन म्हणाल्या, "उठा, सर फॅन्सिस ड्रेक, उठा!" राणीनें त्याला 'सर' ही पदवी दिली. म्हणजे तो आतां मानकऱ्यांच्या खुर्चीवर जाऊन बसला. इंग्लंडच्या सामान्य लोकांनीं मात्र त्याचें कौतुक करूनही त्याची किंमत मात्र बरोबर ठरविली; आणि

' समुद्रावरचा बडा चोर किंवा चांच्या ' ही पदवी त्याला अर्पण केली ! चांच्या म्हणून जरी ड्रेकचें नांव प्रसिद्धीस आलें असलें तरी, अटलांटिक महासागर, दक्षिण महासागर, पॅसिफिक महासागर, हिंदी महासागर हे ओलांडून त्या दिवसांत त्यानें पृथ्वीप्रदक्षिणा केली हें त्याचें वैभव संशोधनाच्या इतिहासांत शिल्लकच राहतें !

---

# बार्थोलोमो व वास्को-दि-गामा

कॅप्टन कुक्, कॅप्टन् स्कॉट इत्यादि इंग्रज संशोधकांनीं भूपृष्ठाचा शोध लावण्याच्या कामीं मोठी कीर्ति मिळवली आहे हें खरें; पण संशोधनाच्या कामाचा आरंभ स्पेन आणि पोर्तुगाल या दोन देशांनीं केला आहे. त्यांनीं केवळ आरंभ केला असेंही नव्हे, तर अमेरिका खंड शोधून काढणें, पृथ्वीची प्रदक्षिणा करणें, अमेरिका व आफ्रिका या खंडांना दक्षिणेकडून वळसा घालणें आणि यांच्या दोन्ही किनाऱ्यांवर आपलीं ठाणीं बसाविणें, येथपर्यंतचें यश या राष्ट्रांनींच संपादलेलें होतें. या प्रकरणांत पोर्तुगालचे संशोधक बार्थोलोमो आणि वास्को–दि–गामा यांनीं केलेल्या पर्यटणांचें वृत्त द्यावयाचें आहे.

पोर्तुगालचा राजा दुसरा जो अथवा जॉन् यानें मार्को पोलोच्या प्रवासाची हकीकत वाचलेली होती. इटालियन आणि फ्रेंच मिशनरी तांबड्या समुद्रांतून हिंदुस्थानांत गेले आणि तेथें त्यांनीं धर्मप्रसाराचें काम केलें अशा हकीकतीही त्याच्या कानांवर आल्या होत्या. तसेंच व्यापारी लोकांच्या तोंडून त्यानें ऐकलें होतें कीं, आफ्रिका खंडाच्या पूर्व किनाऱ्यावर अरब व्यापाऱ्यांनीं आपल्या वखारी घातलेल्या आहेत. मधून मधून

पोर्तुगालमध्यें ज्यू लोक त्यांना सांगत कीं, पंधराव्या शतकाच्या शेवटच्या पंचविशींत, सोनें, हस्तिदंत इत्यादींची देवघेव हिंदुस्थान आणि आफ्रिका खंड यांत सुरू झालेली आहे, असें आपण मिसर देशांत म्हणजे इजिप्त-मध्यें ऐकलें.

किंग जॉनला संशोधनाची आवड उपजतच होती. त्याला वाटे कीं, आपल्या तांडेलांनीं चारी दिशांनीं समुद्रावर भ्रमन्ति करावी आणि कोणचे देश कोठें आहेत, तेथील लोक कोणच्या भाषा बोलतात, त्यांचे धर्म आणि त्यांचीं राज्यें कशीं आहेत हें सारें त्यांनीं पाहून यावें. यांतच वर सांगितलेल्या हकीकती जेव्हां त्याच्या कानीं पडल्या, तेव्हां तर त्याची जिज्ञासा जास्तच प्रखर झाली. हळूंहळूं त्याची खात्री होऊन चुकली कीं, आफ्रिका खंड हें दक्षिणेकडे कोठें तरी संपलेलें असलें पाहिजे. त्याला वळसा घातला कीं, ज्या अरबस्तानाविषयीं व हिंदुस्थानाविषयीं लोक बोलतात त्या देशांच्या किनाऱ्याला आपलीं जहाजें सहज नेतां येतील.

१४८१ सालीं हा जॉन गादीवर आला; आणि आफ्रिकेला लागून असलेला दक्षिण अटलांटिकचा किनारा आपण शोधून पाहणारच पाहणार, असा निश्चय त्यानें केला.

१४८२ त कांहीं पोर्तुगीज नावाडी या किनाऱ्यानें बरेच दक्षिणेकडे गेले. खालीं जातां जातां ते काँगो नदीच्या मुखांत शिरले. एकदम भर समुद्रांत जाणें अर्थात्च धोक्याचें होतें. म्हणून नावाडी लोक किनाऱ्याच्या आश्रयानें आपला जलप्रवास चालू ठेवीत. शिवाय गोड्या पाण्याचा सांठा त्यांना पुन्हां पुन्हां करून घ्यावा लागे; आणि अन्नाचें कोठार संपत आलें तर किनाऱ्यावर उतरून धान्यें, फळें मिळवावीं, किंवा मासे धरावे असें त्यांना करावें लागे. अर्थातच किनाऱ्यावर लागणारीं भूशिरें, खाड्या, उपसागर किंवा नद्यांचीं मुखें यांना योग्य तीं नांवें ते देत. काँगो

हें नांव या नदीला या पोर्तुगीज प्रवाशांनीं दिलें कीं काय, हें आपल्याला माहीत नाहीं. पण ते येथपर्यंत पोहोंचले एवढें खरें. पुढें दोन वर्षांनीं ज्युगो काम् हा खलाशी कॉंगो नदीचें मुख ओलांडून कुनिनी नदीच्या मुखापर्यंत गेला. कुनिनी याचा अर्थ मोठी नदी असा आहे. पुढील वर्षी हा नावाडी पुढें जिला जर्मन साऊथ वेस्ट आफ्रिका असें नांव मिळालें, तिच्या किनाऱ्यापर्यंत जाऊन पोहोंचला. तेथल्या एका भूशिराला कागोदा क्रूस असें नांव त्यानें दिलें; आणि तेथें एक संगमरवरी पाषाणाचा स्तंभ उभा केला. १९ व्या शतकाच्या आरंभापर्यंत हा स्तंभ तेथें उभा होता.

या सर्व नावाड्यांनीं केलेल्या पराक्रमाचीं वर्णनें किंग जॉनच्या कानीं अर्थातच जात होतीं. शेवटीं १४८६ सालीं बार्थोलोमो याला त्यानें आज्ञा केली कीं, "तूं आतां याच्याही खालीं जा. हें आफ्रिका खंड कोठें संपलें आहे तें पहा; आणि त्याच्या दक्षिण टोंकाला वळसा घालून परत ये."

राजाच्या आज्ञेप्रमाणें बार्थोलोमो टागस् या बंदरांतून निघाला. त्याच्यापाशीं दोन लहान लहान जहाजें होतीं. असल्या जहाजांतून सध्यां कोणी मुंबईहून गोव्यालासुद्धां जाणार नाहीं. पण बार्थोलोमो धाडसी नावाडी होता; आणि त्याला राजाची आज्ञा झाली होती. हा जलप्रवास कमींत कमी ६००० मैलांचा होता. अटलांटिक महासागर तर पुष्कळदां खवळलेला असतो; आणि हिंदी महासागरावर नेहमींच पर्वतप्राय लाटा उठतात असें त्यानें ऐकलें होतें; पण त्यानें हें साहस करावयाचें ठरविलें.

वाटलें होतें तें दुर्दैव बार्थोच्या वाट्याला आलें नाहीं. त्याचीं तीं दोन लहानगीं जहाजें आफ्रिकेच्या कांठानें पुष्कळच खालीं गेलीं आणि आंग्रापिकेना या नांवाच्या उपसागरांत जाऊन दाखल झालीं.

हा उपसागर विषुववृत्ताच्या खालीं सुमारें २६° वर आहे. खिस्ती माणसांचा पाय विषुववृत्ताच्या खालच्या भूमीला अशा रीतीनें पाहिल्यानेंच लागला असा तेव्हां तरी या लोकांचा समज झाला. बार्थोलोमोचे लोक किनाऱ्यावर उतरले तेव्हां त्यांना कांहीं रानटी माणसें तेथें दिसलीं. ते हॉटेन्‌टॉट् अथवा बुशमेन असावे. देवदूतांसारखीं हीं कांतिमान माणसें आणि अवजाराचे पंखे लावलेल्या त्यांच्या नावा पाहून तीं अगदीं चाकित आणि भयभीत होऊन गेलीं. बार्थोलोमोच्या लोकांनीं येथें बरीच शिकार केली आणि मासेही धरले. यामुळें पुष्कळ ताजें अन्न त्यांना येथें भरून घेतां आलें.

बार्थोलोमोनें मध्यें कोठें तरी कांहीं निग्रो जातीच्या बाया पकडून जहाजावर घेतलेल्या होत्या. त्यांतली एक बाई त्यानें या लोकांत सोडून दिली. त्याची अपेक्षा अशी होती कीं, त्यांची भाषा या बाईला समजेल आणि तिच्या द्वारां हे लोक कोण आहेत, काय आहेत, याची माहिती आपल्याला होईल. पण ही बाई त्या लोकांत गेली ती परत आलीच नाहीं!

अंग्रापिकेना सोडल्यानंतर बार्थोलोमोला वादळी वाऱ्याचा फारच उपद्रव झाला. परंतु तो तसाच खालीं चालला आणि ऑरेंज नदीच्या मुखावर आला. थोडासा मुक्काम करून तो पुन्हां दक्षिणेकडे निघाला आणि बरेंच अंतर तुटल्यावर तो आग्नेयेच्या बाजूला वळला. जमीन आग्नेयेकडे ढळत चालली आहे हें पाहिल्यावर आफ्रिकाखंड येथें खासच संपलें असलें पाहिजे, आणि हें वळसतां येण्यासारखें आहे अशी त्याची खात्री होऊन चुकली. मग आग्नेयेचा रोख सोडून तो थेट पूर्व दिशेनें निघाला. पण पुढें जावें, तों तों, किनाऱ्यापासून आपण दूर पडत आहों, असें त्याच्या ध्यानांत आलें. याचा अर्थ त्यानें असा केला कीं, ईशान्येच्या बाजूला हा किनारा वर हटत असावा. आणि हा त्याचा अर्थ बरोबर होता.

आतां त्यानें आफ्रिकेच्या टोंकाला वळसा खचितच घातला होता. पण नवलाची गोष्ट ही कीं, आफ्रिकेचें जें सगळ्यांत दक्षिणेकडचें टोंक त्याला याचीं जहाजें मुळींच लागलेलीं नव्हतीं !

ईशान्येकडे जातां जातां सध्यांची जी केप कॉलनी आहे, तिच्या दक्षिण टोंकाला तो लागला. तेथील खाडीला त्यानें गुराख्यांचा उपसागर ( बे ऑफ् दि कॅटूल् कीपर्स ) असें नांव दिलें. कारण किनाऱ्यावर दूरपर्यंत जिकडे तिकडे गुरें आणि गुराखी हे त्याला दिसून आले. बार्थोलोमोचीं जहाजें पाहतांच गुराख्यांनीं आपलीं गुरें किनाऱ्यावरून घराकडे पिटाळत नेलीं !

या उपसागरांत जहाजांची थोडी डागडुजी करून बार्थोलोमो पुढें निघाला. पुढें जातां जातां तो अल्गोआ उपसागरांत आला. तेथें त्यानें एक पाषाणाचा क्रॉस उभा केला आणि त्यावर पोर्तुगालच्या शस्त्राची निशाणी केली. किनाऱ्यावर रानटी लोक मासे धरीत होते. हे सारे हॉटेन्टॉट् जातीचेच होते. ईशान्येकडे जातां जातां त्याला निळें पाणी लागूं लागलें आणि तें आतांपर्यंतच्या पेक्षां उबट आहेसें वाटलें. आतां तर त्याची खात्री झाली कीं, आपण आफ्रिकेला वळसा घातला आहे. कारण विषुववृत्ताकडे आपण वर चाललों आहों, हें या खुणांवरून त्याच्या ध्यानांत आलें.

येथून बॉर्थोलोमो परत वळला. परतीच्या वाटेवर मात्र आफ्रिकेच्या अगदीं दक्षिण टोंकाला त्याचें जहाज लागलें. या वेळीं तेथें मोठें वादळ सुरू असल्यमुळें काबो टॉर्मेन्टोसो (म्हणजे वादळी भूशिर) असें नांव त्यानें त्या टोंकाला दिलें. येथें किनाऱ्यावर उतरून बॉर्थोलोमोनें सेंट फिलिप्च्या नांवानें एक संगमरवरी स्तंभ उभा केला. वाटेनें गिनीचें आखात आणि गोल्ड कोस्ट येथें मुक्काम करीत करीत बार्थोलोमो पोर्तुगाल देशाला परत आला. सांगितलेलें काम यशस्वी करून हा तांडेल परत आलेला पाहून, किंग

जॉनला फारच आनंद झाला. त्यानें त्याचें मनापासून स्वागत केलें; आणि ज्या भूशिराला त्यानें वादळाचें भूशिर असें नांव दिलें होतें, त्याला राजानें केप ऑफ गुड होप म्हणजे शुभाशेचें भूशिर असें नांव दिलें.

बार्थोलोमोनें आफ्रिकेला वळसा घातला हें खरें, पण हिंदुस्थान, अरबस्तान, आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील अरबी लोकांचीं मकाणें येथपर्यंत आपल्या नावाड्यांनीं गेलें पाहिजे ही जॉनची भूक अजून शमली नव्हती. शिवाय दरम्यानच्या काळांत, त्याच्या कानांवर असें एक वर्तमान आलें होतें कीं, तांबड्या समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यावर कोठें तरी ॲबिसिनिया या नांवाचें खिस्ती राज्य आहे. म्हणून आणखी कोणाला तरी आफ्रिकेच्या किनाऱ्यानें पूर्वेकडे आणि उत्तरेकडे पाठवावें असा बेत त्यानें केला आणि वास्को-दि-गामा याला हें काम त्यानें सांगितलें.

किंग जॉन इतक्यांत मरण पावला; पण गादीवर आलेला त्याचा पुतण्या मनोन यालाही समुद्रशोधनाची हौस चुलत्यासारखीच होती. त्यानें दोन मोठालीं जहाजें तयार केलीं. त्याची पहिली कल्पना अशी होती कीं, बार्थोलोमोलाच या कामावर पाठवावें. परंतु वाटाघाट होऊन चुलत्यानें ज्या वास्को-दि-गामाकडे हें काम दिलें होतें, त्याच्याकडेच त्यानें तें कायम केलें.

१४९७ त गामाची ही सफर सुरू झाली. हा गामा या वेळीं ३७ वर्षांचा होता. याचें अजून लग्न झालें नव्हतें. हा अंगानें सडपातळ असून बेताचाच उंच होता. पोर्तुगीज लोक तेव्हां ठेवीत असत तशी यानें लांब दाढी ठेवली होती आणि चेहऱ्यावरून पाहतां याला कांहीं भावना असतील असें कोणाला वाटलें नसतें. याचा स्वभाव मनस्वी करारी होता; आणि धैर्याचा तर हा पुतळाच होता. पण हा अतिशय करडा आणि

बोलण्याचालण्यांत तुसड असे. एकदां हा रागावला म्हणजे लोक म्हणत कीं, या बाबापासून चार पावलें दूरच असावें. थोडासा धार्मिक समारंभ झाला आणि जुलैच्या ८ तारखेला **तागस** बंदरांतून वास्को-दि-गामाचीं जहाजें बाहेर पडलीं.

जहाजावर एकंदर १७० लोक होते. काळ्या पाण्याची शिक्षा झालेले कांहीं कैदी त्यानें बरोबर घेतले होते. या कैद्यांना वाटेंत लागणाऱ्या किनाऱ्यावर कोठें कोठें सोडावें आणि त्यांच्याकडून तेथील लोकांची कांहीं माहिती मिळवतां आली तर पहावी असा गामाचा हेतू होता. **केप ऑफ गुड होप**च्या उत्तरेस **सेंट हेलिना** नांवाच्या उपसागरांत गामा प्रथम उतरला. या ठिकाणीं त्याला कोणी माणसेंही दिसलीं नाहींत आणि गोडें पाणीही मिळालें नाहीं. पुढला मुक्काम त्यानें **सेंट जेम्स** या नदीच्या मुखांत केला. येथें मात्र पिण्याचें पाणीही भरून घेतां आलें आणि चांगल्या तऱ्हेचे मासेही सांपडले. येथें गामानें एक हॉटेन्टॉट माणूस पकडून जहाजावर आणला. एकमेकांचें बोलणें एकमेकांना बिलकूल कळेना. पण त्या रानटी माणसाला त्यांनीं कांहीं गंमतीच्या चिजा दिल्या; खायला प्यायला दिलें, तेव्हां स्वारी खुष झाली; आणि खालीं जाऊन तो आपल्या मित्रांना घेऊन जहाजावर परत आला. हे लोक टेंगणे, कुरूप आणि काळे असून त्यांनीं अंगांवर गुरांचीं कातडीं घेतलेलीं होतीं; आणि त्यांच्या हातांतील काठ्यांना टोंकदार हाडकें किंवा शिंगें बसवलेलीं होतीं. बोलूं लागले म्हणजे ते एवढे चमत्कारिक हावभाव करीत कीं, हे दारू प्यायले आहेत, असेंच कोणाला वाटावें. यांचें खाद्य म्हणजे कंदमुळें आणि समुद्रांतले मासे. या लोकांचें आणि गामाच्या लोकांचें बरें जमलें. पण इतक्यांत एका पोर्तुगीज खलाशानें त्यांची कांहीं खोड काढली. त्याबरोबर ते चवताळून उठले. येथें आपला फारसा निभाव लागणार नाहीं,

असें पाहून गामानें जहाजें हांकारलीं आणि केप ऑफ गुड होपला वळसा घालून नोव्हेंबरच्या २६ तारखेला तो मोसेल उपसागरांत आला.

हे लोकही हॉटेन्टॉटच होते. समुद्रावर जहाजें पाहून हे भराभर वाळवंटावर दाखल झाले. यांतले बरेचसे बैलांवर बसून आले होते ! त्यांना माणसाळविण्यासाठीं गामानें मणी, तांबड्या टोप्या आणि इतर कांहीं चकमकीत गमतीच्या चिजा त्यांना दिल्या. तेव्हां त्यांनींही हस्तिदंताच्या अंगठ्या गामाला परतभेट म्हणून दिल्या. या अंगठ्यांबरोबरच झुपकेदार शेपटाच्या मेंढ्याही त्यांनीं दिल्या. या मेंढ्यांचें स्वादिष्ट मांस पाहुणे-मंडळींना चांगलेंच मानवलें. इतर ठिकाणच्या लोकांप्रमाणें या युरोपियन लोकांना पाहून येथले हे हॉटेन्टॉट भ्यायल्यासारखे दिसले नाहींत. उलट आपल्या बांसऱ्या वाजवीत ते त्यांच्यापुढें येऊन उभे राहिले. गामानें येथें कांहीं दिवस मुक्काम केला. पण त्याच्या खलाशांचीं व या लोकांचीं भांडणें होऊं लागल्यामुळें मुक्काम हलवणें गामाला बरें वाटलें. पण तेथून हलतां हलतां असें दिसूं लागलें कीं, हे रानटी लोक कदाचित् चाल करून येतील. त्याबरोबर गामानें चार तोफांचे गोळे सोडले आणि बाणांचीही वृष्टि केली. भय खाऊन रानटी लोक एकदम पळून गेले.

१४९७ च्या खिसमस दिवशीं आपण एका फार सुंदर देशाच्या शेजारून चाललों आहोंत, असें गामाला दिसून आलें. दूर दिसणाऱ्या डोंगरावर झाडांच्या राया लागलेल्या होत्या आणि मैदानें हिरवींचार दिसत होतीं. गुरांचे कळप सर्वत्र हिंडत होते. खिस्त–जन्माच्या दिवशीं ही भूमि दिसली म्हणून त्यानें तिला ‘ टेरा डि नाताल ’ म्हणजे नाताळाची अथवा जन्मदिवशीं दिसलेली भूमि असें नांव दिलें. एखादें सोयस्कर बंदर दिसलें असतें, तर त्यानें जहाजें किनाऱ्याला लावलींही असतीं. पण तसें बंदर कोठें दिसेना; म्हणून तो तसाच उत्तर दिशेनें जात

राहिला. जातां जातां, लिम्पोपो नदीच्या मुखापाशीं त्याचीं जहाजें येऊन लागलीं. त्यानें या नदीला " रिव्हर ऑफ दि किंग्ज " म्हणजे राजनदी असें नांव दिलें. हा दिवस १४९८ जानेवारी ६ हा होता; आणि जानेवारी ६ ला छोट्या येशूला पहाण्यासाठीं राजे लोक आलेले होते. पुढें या नदीला ताम्र नदी ( रिव्हर ऑफ् कॉपर ) असें नांव देण्यांत आलें. कारण तेव्हांच्या पाहु-



ण्यांना पहावयास मुखापाशीं आलेल्या त्या रानटी माणसांनीं अंगावर तांब्याचे दागिने घातले होते ! हे लोक काळे असले तरी उंच, सुंदर आणि नाजूक दिसले. जहाजावरील एका माहितगार माणसाला वाटलें कीं, या

लोकांची भाषा आपल्याला थोडीशी समजते. काँगो नदीच्या मुखाजवळ भेटलेल्या लोकांची भाषा तो थोडीशी शिकलेला होता. येथील लोकांच्या तोंडचे शब्दही त्याला थोडेसे तसेच वाटले. प्रत्यक्ष अनुभवानें दिसून आलें कीं, एकमेकांपासून दोन हजार मैल दूर असलेल्या या दोन्ही लोकांच्या भाषेंत पुष्कळच साम्य आहे. या पाहुण्यांचे कांहीं शब्द त्याला समजले आणि त्याचे कांहीं शब्द या पाहुण्यांना समजले. सर्व दक्षिण आफ्रिकेभर बान्टू भाषेपासून निघालेल्या भाषा पसरलेल्या आहेत, या सिद्धांताचें उगमस्थान हेंच होय असें म्हटलें तरी चालेल. येथील लोकांशीं गामाच्या खलाशांचा कसलाही भांडणतंटा झाला नाहीं. म्हणून त्यानें या टापूला 'भल्या लोकांचा देश' (लॅन्ड ऑफ दि गुड पीपल) असें नांव दिलें.

येथून गामा निघाला तो किनाऱ्याला कोठेंही न लागतां **क्विलिमाने** नदीच्या मुखापाशीं येऊन ठेपला. **झांबेझी नदी** समुद्राच्या जवळ जों जों येऊं लागते तों तों तिला अनेक फांटे फुटतात. त्यांपैकीं एका फाट्याला क्विलिमाने असें नांव आहे. येथें पोहोंचल्यावर एका अपरिचित संस्कृतीच्या खुणा त्याला दिसूं लागल्या. आतांपर्यंत त्याला भेटलेले लोक केवळ दिगंबरच होते. परंतु येथील लोकांनीं वस्त्र परिधान केलेलें दिसलें. यांच्या नावांना डोलकाठ्या आणि अवजारें होतीं. हे युरोपियन लोकांना भ्यायले तर नाहींतच, पण पुढें येऊन अरबी भाषेंत कांहीं बोलूं लागले. आफ्रिके-च्या वायव्य किनाऱ्यावरील मोरोक्को देशांत अरबी भाषा या पोर्तुगीज लोकांनीं ऐकलेली होती. स्वाभाविकपणेंच या लोकांचें बोलणें त्यांना एकदमच कळलें. कांहीं संकरज प्रजाही येथें त्यांना दिसली. या प्रजेचे पुढारी बरे उमदे असून त्यांनीं अंगांत साठणीचे कपडे घातले होते आणि डोक्याला रेशमी कोशे बांधले होते. त्यांचें वर्तन मित्रभावाचें असल्यामुळें गामानें येथें पुष्कळ दिवस मुक्काम केला. जहाजें धुवावयाचीं

होतीं; आणि त्याची कांहीं डागडुजी करणेंही अवश्य होतें. तसेंच दंत-रोगानें पुष्कळ खलाशी जेर झालेले होते. मुक्कामाचा कांहीं उपयोग झाला खरा; पण तेथल्या डांसांमुळें या खलाशांना हिंवताप येऊं लागला. गामानें आपला मुक्काम एकदम हलवला. पण निघण्यापूर्वी येथें त्यानें एक स्तंभ उभा केला.

पांच दिवस वाटचाल झाल्यावर तो एका उथळ उपसागरांत आला. तेथें अनेक लहान लहान बोटी त्याला भेटल्या. यांवर काळ्या वर्णाचे स्वाहिली अरब खलाशी होते. यांनीं पस्त्यापस्त्याच्या विजारी घातल्या होत्या; डोक्याला रेशमी पागोटीं गुंडाळलेलीं होतीं; आणि कमरेला तलवारी लटकावल्या होत्या. मोकळ्या मनानें ते गामाच्या जहाजावर आले. त्यांना वाटलें कीं, हे लोक गोरे असले तरी मुसल्मानच असावेत. जहाजें आणि खलाशांचे पोषाख हीं पाहून त्यांचा अंदाज असा झाला कीं, हे पाहुणे मिसर देशांतून आले असावे. ‘ शेजारच्या **मोसांबिक** नांवाच्या बेटावर आपण राहतों; आणि **किलवा** येथील सुलतानाच्या ताब्यांत हें बेट आहे ’ अशी माहिती त्यांनीं दिली. ‘ येथूनच हिंदुस्थानाशीहि व्यापार चालतो ’ हे शब्द त्यांच्या तोंडून आले तेव्हां गामाच्या मनाला आपल्या सफरीची मूळ कल्पना चाटून गेली.

गामाच्या हाताखालचा एक कॅप्टन् नावेंत बसून या मोसांबिक बेटा-कडे गेला. त्याला भेटावयास बेटावरचा अरब शेख आला. मध्यम वयाच्या, उंच आणि सडपातळ अंगाच्या या शेखनें अंगांत एक बिन-बाह्यांचा झगा घातला होता. त्याच्या डोक्यावर एक जाड पागोटें होतें आणि त्याला जरीची वेलबुट्टी होती. त्याच्या पायांत मोठ्या नक्षीच्या मखमलीच्या चपाला होत्या. कमरेला एक तलवार लटकत असून तिच्या म्यानावर रंगीबेरंगी खडे बसविले होते. दुसऱ्या एका रुपेरी म्यानांत बसवलेली वाकडी तलवार त्याच्या हातांत होती.

थोड्याशा वेळानें या अरबांच्या ध्यानांत आलें कीं, आपण ज्यांच्याशीं बोलणें चालणें करीत आहों ते लोक मुसलमान नसून ख्रिस्ती आहेत. त्याबरोबर त्यांच्या वागणुकींत फरक पडला! गामाला वाटूं लागलें कीं, त्यांच्या उर्मटपणाला कदाचित् भलतेंच वळण लागण्याचा संभव आहे. म्हणून त्यानें आपलीं जहाजें झटकन् हलवलीं आणि दक्षिणेकडच्या एका बेटावर तो गेला. याच बेटाला पुढें **सेंट जॉर्ज बेट** असें नांव मिळालें. येथें गामानें एक स्तंभ उभा केला आणि एक प्रार्थनापीठ उभारून तेथें भक्तिभावानें त्यानें देवाची प्रार्थना केली. दरम्यान् **किलिमाने** येथें त्यांच्या जहाजावर आलेला एक स्वाहिली अरब पळून जाऊन वर सांगितलेल्या त्या लोकांना जाऊन मिळाला. बरोबर बरींच माणसें घेऊन गामा मोझँबिक्कडे गेला आणि ' आमचा पळून आलेला माणूस परत करा ' असें दरडावून बोलूं लागला. दोघांची झुंज सुरू झाली आणि गामाला लवकरच कळून चुकलें कीं, ही लढाई अंगलट येणार. म्हणून त्यानें चटकन् काढता पाय घेतला आणि तो आपल्या जहाजावर परत आला. आणखी कांहीं फितुरी दिसून आली तेव्हां मोझँबिक्वर गामानें तोफांचा भडिमार करून तेथील मुसलमानांना रकमेला आणलें. शेख तहाच्या गोष्टी बोलूं लागला आणि ' तुमच्या उत्तरेकडच्या सफरीला मी एक वाटाड्या पुरवितों ' असेंही तो म्हणूं लागला.

शेखचा निरोप घेऊन गामा उत्तरेकडे निघाला तो एप्रिलच्या ७ तारखेला **मोंबासा** येथें आला. पण तेथले लोक आपल्याला फारसे अनुकूल नाहींत असा संशय आल्यावरून ८० मैल पुढें असलेल्या **मालिंदी** बंदराला तो आला. **मालिंदीचा** अरबी राजा आणि **मोंबासाचा** शेख हे एकमेकाचे दावेदार होते; म्हणून **मालिंदीच्या** राजानें गामाचें स्वागत मोठ्या प्रेमानें केलें. दोघांचा तहनामा झाला आणि याची खूण म्हणून एक संगमरवरी स्तंभ तेथें उभारण्यांत आला. येथवर पोहोंचेतोपर्यंत

गामाच्या खलाशांपैकीं निम्मे लोक आजारी पडून मरून गेले होते आणि उरलेले कायमचे दुखणाईत झालेले होते. अर्थात् येथून पुढें हिंदुस्थानला जाऊन परत पोर्तुगालला जातां येईल असें गामाला वाटेना. पण मालिंदीची हवा फार आल्हादकारक व खाण्यापिण्याची चंगळ यांमुळें हीं दुखणाईत मंडळी परत चांगली ताजीतवानी झाली आणि गामानें हिंदुस्थानकडे निघावयाचें ठरविलें. मालिंदी येथें त्याला एक गुजराथी वाटाड्या मिळाला. त्याला बरोबर घेऊन हिंदी महासागर ओलांडून वास्को–दि–गामा कालिकत बंदरांत येऊन ठेपला.

हिंदुस्थानांत गामानें काय काय केलें याची ओळख हिंदुस्थानचा इतिहास वाचणाऱ्या सर्वच लोकांना चांगली आहे. म्हणून त्याची हकीकत येथें देत नाहीं. राजानें सांगितलेलें काम आपण करून दाखविलें आहे, अशा आनंदांत गामा परत पोर्तुगालकडे निघाला. पूर्वींच्या लागलेल्या अनेक उपसागरांत आणि बेटांवर त्यानें पुन्हां मुक्काम केला आणि दक्षिणेकडे जातां जातां १४९९ मार्च २० ला तो केप ऑफ् गुड होपला येऊन लागला. वास्तविक पाहतां पश्चिम आफ्रिकेच्या कांठाकांठानें तो पोर्तुगालकडे गेला असता तरी चाललें असतें. पण केप ऑफ् गुड होपपासून तो थेट पश्चिमेकडे दूरवर गेला; इतका कीं, त्याला शेवटीं **केप वर्दे आयलंडज्** हीं बेटें लागलीं. तेथील एका बेटांत आपलें जहाज दुरुस्तीसाठीं गामानें ठेवलें आणि आपला मरणोन्मुख भाऊ पॉलो याला बरोबर घेऊन तो एका लहानशा होडग्यांत बसून उत्तरेच्या रोखानें निघाला. पण वारा असा सोसाट्याचा सुटला कीं, त्याचे तें पडाव पश्चिमेकडेच जाऊं लागलें. शेवटीं तो **अझोर बेटांत** जाऊन पोहोंचला. तेथें त्याचा भाऊ मरण पावला. भावाचा दफनविधी उरकून गामानें पुन्हां १००० मैलांची सफर मारली आणि ऑगस्ट महिन्याच्या शेवटीं शेवटीं पोर्तुगालची राजधानी **लिस्बन** येथें तो येऊन पोहोंचला.

# अमेरिगो व्हेसपुक्सी

ज्या संशोधकाचें नांव अमेरिका खंडाला मिळालेलें आहे त्याचा थोडासा इतिहास या प्रकरणांत देतों.

१४९७ त कॅबट या नावाड्यानें लॅब्राडोरवर पाय टाकला आणि याच्या आधीं एक वर्ष अमेरिगो व्हेसपुक्सी यानें पश्चिमेची एक सफर केलेली होती. हा अमेरिगो ज्योतिष–विद्या जाणत असे. संशोधनाचा इतिहास लिहिणारांत असा एक वाद आहे कीं, कोलंबसाच्या आधीं या अमेरिगो व्हेसपुक्सीनें अमेरिका खंड पाहिलेलें होतें. तें त्यानें पाहिलेलें असो किंवा नसो, त्याचें नांव या खंडाला कां मिळालें याची हकीकत मात्र फार मनोरंजक आहे.

१५०१ या वर्षी व्हेसपुक्सीनें स्पेनच्या फर्डिनंड राजाची नोकरी सोडली आणि तो पोर्तुगालच्या मॅन्युअल राजाच्या हाताखालीं नोकरीस राहिला. आतापर्यंत व्हेसपुक्सीनें संशोधक म्हणून फारच मोठी कीर्ति मिळविली होती. असा हा तांडेल आपल्या पदरीं राहिलेला पाहून मॅन्युअलला फारच समाधान झालें.

१५०१ मे महिन्याच्या १४ तारखेला व्हेसपुक्सीचीं तीन जहाजें लिस्बनमधून निघालीं. मदिरा आणि कॅनरी या बेटांवरून तीं केप वर्दी येथें

पोहोंचला. तेथून त्याचीं जहाजें नैर्ऋत्येच्या रोखानें निघालीं. अटलांटिक महासागरांतील त्याचा हा प्रवास जरी फार धोक्याचा ठरला तरी तो शेवटीं ब्राझिलच्या किनाऱ्याला येऊन पोहोंचला. या ठिकाणाला **सेंट रोक** भूशिर असें नाव त्यानें दिलें. कारण ज्या दिवशीं तो पोहोंचला त्या दिवशीं या सत्पुरुषाची पुण्यतिथि होती. ब्राझिलचा हा टापू व्हेस-पुक्सीला मोठा आल्हादकारक दिसला. पण तेथील रहिवासी मात्र त्याच्याशीं जुळतें घेईनात. दर वेळीं ते वर्दळीवर येऊं लागले. पुढें तांडेलानें दोन माणसें मुद्दामच आंत धाडलीं. पण त्या रानटी लोकांनीं त्यांना हातोहात मारून टाकलें. मग या लोकांना थोडें भय उत्पन्न करावें व त्यांची करमणूकही करावी म्हणून बरोबर नेलेला एक भला मोठा पहिलवान त्यानें त्यांच्या वसतींत धाडला. त्यानें नाना प्रकारच्या कसरती तेथें करून दाख-विल्या आणि बघे लोक संथपणें पहात उभे राहिले. पण इतक्यांत एक बाई पलीकडच्या टेकडावरून खालीं आली आणि त्याला नकळत आपल्या हातांतील भला मोठा सोटा तिनें त्याच्या डोक्यावर एवढ्या जोरानें मारला कीं, हा पोर्तुगीज पहिलवान एकदम गतप्राण होऊन धरणीवर पडला. लगोलग भोंवतालची मंडळी त्या प्रेताच्या भोंवतीं जमा झालीं आणि त्यांनीं तें प्रेत ओढीत ओढीत त्या टेकाडाकडे नेलें. तेथें त्यांनीं त्याचे तुकडे तुकडे केले आणि ते चुलवणावर ठेवून शिजवले आणि ह्या पोर्तुगीज लोकांच्या डोळ्यादेखत त्यांनीं हें नरमांस खाऊन टाकलें. याच्या आधींचीं जीं दोन माणसें नाहीशीं झालीं होतीं त्यांची वाट अशीच लागली असली पाहिजे, हें अमेरिगो व्हेसपुक्सीनें ओळखलें. पण या लोकांना शिक्षा करावी तर आपले पुढले सारे बेत फसतील हें ओळखून व्हेसपुक्सीनें आपलीं जहाजें हांकारलीं आणि ब्राझिलच्या कांठाकांठानें तो दूरवर खालीं गेला. जेथें थांबावें तेथें लोक नरमांस-भक्षक आहेत असें दिसावें; पण वनश्री मात्र

इतकी रमणीय असावी, कीं 'नंदनवन' 'नंदनवन' म्हणून म्हणतात तें येथेंच कोठें तरी असावें असें त्यांना वाटलें.

खालीं जातां जातां विषुववृत्ताची रेषा त्यांनीं ओलांडली आणि ते एका मोठ्या उपसागरांत शिरले. यालाच त्यांनीं रिओ डि-जेनिरो हें नांव दिलें. आणखीं पुढें गेल्यावर लाप्लावा नदीचें मुखही त्यांना लागलें.

परंतु यापुढें या प्रदेशाच्या कांठानें खालीं जावें, ही कल्पना त्याला मानवेना. कारण हा सारा जल-प्रवास अगदीं वांझा होत होता. व्हेस-पुक्सीला वाटे कीं, येवढें साहस करावयाचें तर जेथें बख्खळ सोनें सांपडेल त्या देशाला जावें. मग त्यानें सहा महिन्यांचें गोडें पाणी नावेवर भरून घेतलें आणि फेब्रुआरीच्या १५ तारखेला ब्राझीलचा किनारा सोडून तो भर अटलांटिकमध्यें शिरला.

वारा अनुकूल होता आणि ते आग्नेयेकडे चाललेले होते. शेवटीं एप्रिलच्या ३ तारखेला व्हेसपुक्सीला दिसूं लागलें कीं, इकडच्या प्रदेशांत रात्री फार मोठ्या होत आहेत. त्यानें आपल्या इतिवृत्तांत म्हटलें आहे, "७ एप्रिलची रात्र १५ तासांची होती. ज्या बेटाला पुढें कॅप्टन् कुक यानें साऊथ जॉर्जिया हें नांव दिलें त्या बेटावर या दिवशीं आम्हीं आलेलों होतों." आतां याच्यापुढें खालीं जावें तर थंडीचा आणि बर्फाचा धोका उत्पन्न होईल हें पाहून तो त्याच दिवशीं उत्तरेकडे वळला. कारण, "एक दिवस जर उशीर झाला असता, तर आम्हीं सारे मरून गेलों असतों" असें त्यानें इतिवृत्तांत लिहिलें आहे. आफ्रिकेवरून तो पोर्तुगालला परत आला आणि जेव्हां त्यानें ब्राझिलच्या प्रदीर्घ किनाऱ्याची हकीकत राजाला सांगितली, तेव्हां सर्वांच्या डोक्यांत असा प्रकाश पडला कीं, 'आपण ज्या प्रदेशाला आतांपर्यंत आशिया खंडाचाच एक भाग समजत होतों तो एक स्वतंत्र खंड असला पाहिजे. हा आशियाचा भाग नसला पाहिजे.'

अमेरिगो व्हेसपुक्सीनें याला ' नवें जग ' असें नांव दिलें आणि अजूनही तेंच नांव रूढ राहिलें आहे.

व्हेसपुक्सी हा कोलंबसाच्याही आधीं उत्तर अमेरिकेंत पोहोंचला होता असें मानावयास भरपूर जागा आहे. पण जाणत्या लोकांचें मत असें आहे कीं, किनाऱ्यानें खालीं खालीं जात कोलंबस ब्राझीलपर्यंत येऊन पोहोंचला होता. म्हणून दक्षिण अमेरिका शोधून काढण्याचें श्रेय कोलंबसाकडेच जातें. परंतु कोलंबस जरी इकडल्या बाजूला फिरकून गेलेला असला तरी हें एक नवें जग आहे, ही कल्पना कोलंबसाला आली नव्हती. ब्राझीलचा प्रदीर्घ किनारा पाहिल्यावर अमेरिगो व्हेसपुक्सीला ही नव्या जगाची कल्पना प्रथम सुचली आणि आशिया खंडाचा कसलाही संबंध या खंडाशीं नाहीं हें मत त्यानें पहिल्यानें निश्चित केलें. इतकेंच काय, पण या नव्या जगाच्या दक्षिणेकडून वळसा मारला तर हिंदी महासागरांत उतरतां येईल असाही अंदाज त्यानें बोलून दाखवला. अर्थात् नवें जग शोधून काढण्याचा मान या अमेरिगोकडे जातो. कारण कोलंबसालासुद्धां अजून वाटत होतें कीं, आपण ज्या देशांत अनेक सफरी केल्या तो आशिया खंडाचाच भाग असला पाहिजे !

१५०७ या वर्षीं वॉल्ड सी मूलर यानें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत त्यानें म्हटलें आहे कीं, " आफ्रिका, युरोप, आणि एशिया हीं तीन नांवें बायकांच्या नांवावरून आलेलीं आहेत, तर आतां तरी या नव्या जगाचें म्हणजे चौथ्या खंडाचें नांव पुरुषाच्या नांवावरून पडावें आणि तो पुरुष म्हणजे ज्या अमेरिगोनें हें 'नवें जग' शोधून काढलें तोच होय." म्हणून या " नव्या जगाला " वॉल्ड सी मूलर यानें ' अमेरिका ' असें नांव दिलें आणि तेव्हांपासून तेंच नांव कायम झालें. अमेरिगो व्हेसपुक्सी याचा संबंध अमेरिका खंडाशीं अशा प्रकारचा आहे.

# चॅन्सेलर व जेंकिन्सन्

युरोपहून हिंदुस्थान, चीन इत्यादि देशांशीं प्राचीन काळीं सुरू असलेला व्यापार इस्तंबूलवरून आशियामायनरमधून, इराण, अफगाणिस्तान यांतून गेलेल्या एका हमरस्त्यानें चालत असे. परंतु एकदां तुर्की लोकांना लहर आली आणि त्यांनीं ही व्यापाराची वाट अजिबात बंद करून टाकली. पुढें कांहीं धाडसी नावाड्यांनीं इजिप्तच्या किनाऱ्यापाशीं मोठेंच दळणवळण सुरू केलें आणि तेथें त्यांनीं आणून पोंचवलेला माल व्यापारी लोक उंटांच्या किंवा घोड्यांच्या पाठीवरून सिनाई द्वीपकल्पांतून अरबी समुद्राच्या उत्तर किनाऱ्यावर आणूं लागले आणि तेथून या समुद्रांतून तो हिंदुस्थान, चीन इकडे रवाना होऊं लागला. तेव्हां सुवेझचा कालवा नसल्यामुळें उंटादिकांचा उपयोग करावा लागे. परंतु इकडून मालाची वाहतूक नीट होईनाशी झाली आणि व्यापार कुचंबूं लागला. म्हणून अटलांटिक महासागर ओलांडून तरी आशिया खंडांत जावें, किंवा आफ्रिकेच्या दक्षिण टोंकाला वळसा घालून हिंदी महासागरांत जावें या कल्पना जशा निघाल्या, तशी हीही एक कल्पना निघाली कीं, उत्तर समुद्रांतून नॉर्वेच्या उत्तर किनाऱ्या-वर जावें व तेथून युरोपच्या कांठाकांठानें आशिया खंडाचा किनारा गांठावा व

कोठेंतरी सोयस्कर ठिकाणीं दक्षिणेकडे उतरावें. त्यांतच एक कल्पना अशी होती कीं, आशियाच्या किनाऱ्यापर्यंत न जातां तेव्हां मस्कोव्ही या नांवानें अर्धवट माहीत असलेल्या रशियांत उतरावें व तेथून कॅस्पियन समुद्राच्या शेजारून समरकंद व बुखारा इकडे जावें. ही उत्तर समुद्राकडील कल्पना सिद्ध करण्यासाठीं इंग्लंडच्या लोकांनीं कंबर बांधली.

व्यापारी मंडळ्या काढण्याचें बाळकडू या लोकांना याच्याही पूर्वींच मिळालें होतें. कांहीं धनाढ्य लोकांनीं जमवाजमव करण्याचें ठरविलें आणि पंचवीस पौंडांची एक पाती असें ठरवून त्यांनीं ६००० पौंड जमवले. राजाचें लक्षही या कामाकडे लागलें. या कंपनीनें तीन जहाजें



विकत घेतलीं आणि आर्क्टिक् समुद्राच्या बर्फमय पाण्यांतूनसुद्धां टिकाव

धरून राहतील अशा तऱ्हेची त्यांची डागडुजी त्यांनीं केली. तीन जहाजांना तीन चांगले हुषार आणि धाडसी तांडेल त्यांनीं गांठले आणि त्यांच्या हाताखालीं खलाशीं व अधिकारी मिळून शें सवाशें माणसें देण्यांत आली. बोना एस्पराञ्झा या जहाजाचा तांडेल सर ह्यू विलोबी हा होता. हा विलोबी उंच, देखणा आणि रणशूर शिपाई होता. एडवर्ड जहाजाचा तांडेल रिचर्ड चॅन्सेलर हा होता. हाही मोठा साहसी, दृढनिश्चयी असून त्याच्या अंगीं हुन्नरही फार होतें. बोना कॉन्फिडेन्शिया हें तिसरें जहाज डरफूर्थ या तांडेलाच्या हवालीं केलें होतें आणि याच्यावरही लोकांचा मोठाच विश्वास होता. ही सफर सुमारें १८ महिने चालेल असा अंदाज होता; म्हणून इतक्या लोकांना इतके दिवसपर्यंत पुरेल येवढी शिधासामुग्री तिन्ही जहाजांवर मिळून घेतलेली होती. सफरींतील धोका आणि या जहाजांची शक्ति यांच्यांत खरें पाहतां कसलाच मेळ नव्हता; पण नशिबाची परीक्षा पाहण्याची धिटाई तेव्हांच्या लोकांत खरोखरच फार होती. ‘मेलों तर मेलों’ असें म्हणण्याची प्रवृत्ति लोकांच्या ठिकाणीं दिसून येई. शिवाय त्यांच्या या साहसाच्या प्रवृत्तीला एका निराळ्या कारणानें चेतावणी मिळाली होती.

१४९२ त कोलंबस वेस्ट इंडीज बेटांत जाऊन पोहोंचला होता आणि पुढें पांच वर्षांनीं वास्को-दि-गामानें केप ऑफ् गुड होपला वळसा घातला होता. यांचीं नांवें साऱ्या युरोपभर दुमदुमून राहिलीं होतीं. कॅबट् हा अमेरिकेच्या उत्तर किनाऱ्याची हवा पाहून आलेला होता. कोर्टिज यानें मेक्सिकोंत दौड मारली होती. आणि मॅगेलन् यानें सर्व पृथ्वीचीच प्रदक्षिणा केली होती. या शूर लोकांच्या पराक्रमकथांनीं युरोपांतील प्रत्येक देशाचें वातावरण भरून गेलें होतें. इंग्लंड तर बोलून चालून बेटच होतें; आणि तेथील लोकांची पाण्याची भीति साफ मेलेली होती. त्या साहसी

लोकांचा हेवा यांना वाटूं लागावा हें स्वाभाविक होतें. म्हणून अमेरिका किंवा आफ्रिका इकडे जाण्यांत आतां कांहीं नाविन्य नसल्यामुळें वायव्येकडून म्हणजे सध्यांच्या कानडाच्याही उत्तरेच्या बाजूनें पश्चिमेकडे जाऊन किंवा ईशान्येकडून म्हणजे नॉर्वेच्या डोक्यावरून पूर्वेकडे जाऊन, हिंदुस्थान, चीन इकडे जातां येतें कां हें आपण पहावें, अशी ईर्षा त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली; आणि या ईर्षेतूनच वर सांगितलेली सर्व सिद्धता झाली.

१५५३ मेच्या ११ तारखेला या तांडेलांनीं आपलीं जहाजें हांकारलीं. थेम्स नदींतून बाहेर पडून वूलिच्, एरिथ इकडून ते हार्विच येथें आले आणि उत्तर समुद्रांत शिरून आपल्या सफरीला लागले. या तीनही जहाजांचें पुढारीपण विलोबीकडे होतें. ते उत्तरेकडे थोडेसें जातात तों असा सोसाट्याचा वारा सुटला कीं, हीं जहाजें अगदीं घाबरीं झालीं आणि तोंडें फिरवून जलदीनें हार्विच बंदराच्या आश्रयाला आलीं. तीन आठवडे तेथें मुक्काम करून जून २३ ला तीं पुन्हां मार्गस्थ झालीं. उत्तरेकडे जातांना शेट्लंड् बेटावर उतरावें असा त्यांचा बेत होता. परंतु आपण कोठें आहों हें पाहण्याचें कसलेंही साधन त्या दिवसांत खलाशांच्यापाशीं नसे. ते केवळ अदमासा-अदमासानें पुढें जात. पुष्कळ दूर गेल्यावर त्यांच्या ध्यानांत आलें कीं, हीं बेटें मागेंच राहिलेलीं असावीं. आतां जहाजें भर समुद्रांत शिरलेलीं होतीं; आणि उत्तरेकडील गार वारे खलाशांच्या अंगाला झोंबूं लागलेले होते. आपण एका अवघड कामाला निघालों आहों हें तांडेलासकट सगळ्यांच्या ध्यानांत आलें.

जुलैच्या १४ तारखेला त्यांना नॉर्वेचा किनारा दिसूं लागला. हा किनारा अतिशय दंतुर आहे; पण याच्या कांठावर वनश्रीची शोभा मात्र सुंदर आहे हें या ब्रिटिश खलाशांना आपल्या जहाजांतूनच

दिसलें. किनाऱ्यावर मोठमोठाले खडक असून त्यांच्यावर समुद्राच्या लाटा घों घों करून आपटत होत्या. या देशाचेंच केवळ नांव त्या इंग्रजांनी ऐकलेलें होतें. येथें कोठें तरी उतरावें असें त्यांच्या मनानें घेतलें. परंतु किनाऱ्यावरील लोकांना वाटलें कीं, हे चांचे लोक असावे; म्हणून ते आंत पळून गेले. तेव्हांच्या काळीं भुरटे समुद्रचोर फार माजलेले होते. म्हणून किनाऱ्यावरील नॉर्वेजियन लोकांनीं एकदमच पळून जावें यांत कांहीं नवल नाहीं. सर ह्यू विलोबी यानें तेथें उतरावयाची कल्पना सोडून दिली. तेथून तो स्टान फू येथून वार्दो या ठिकाणाकडे चालला. हें एक मच्छिमारीचें लहानसें ठिकाण होतें आणि येथें एक किल्लाही होता. आतां-पर्यंत याच्या पलीकडे कोणीही गेलेलें नव्हतें; किंबहुना तिकडील कसलीही माहिती कोणालाही नव्हती. या वार्दोला जाऊन पोहचावें असें ठरवून, विलोबीनें रिचर्ड, चॅन्सेलर आणि डरफूर्थ यांना सांगितलें कीं, " आपण तिघांनींही एकमेकांच्या जवळपासच असावें; पण जर कदाचित् लाटांच्या हेलकाव्यांनीं आणि वाऱ्याच्या सोसाट्यानें आपण एकमेकांपासून दुरावलों तर सर्वांनीं ध्यानांत ठेवावें कीं, वार्दो येथें आपण जमा व्हावयाचें आहे."

दुर्दैव असें कीं विलोबीचें भय खरें ठरलें. प्रचंड वादळ सुरू झालें आणि कोणी कोणास दिसेनासें झालें. सर्व समुद्रावर धुकें गच्च बसलें; आणि हेलकाव्यांनीं आपण कोठें हेलपाटत चाललों आहों हें त्यांच्या ध्यानांत येईना. रात्रभर वादळाचा धिंगाणा चालला होता. सकाळीं पाहतात तों कोणाचा कोणी नव्हे असें झालें. चॅन्सेलरचें जहाज वार्दोला येऊन लागलें होतें; परंतु विलोबी आणि डरफूर्थ यांच्या जहाजांचा ठाव-ठिकाणा त्याला लागेना. किनाऱ्याला लागल्यावर चॅन्सेलरच्या एडवर्ड जहाजावरील खलाशी विश्रांतीसाठीं खालीं उतरले. वादळानें घाबरे झालेल्या

या लोकांचें स्वागत बंदरांतील लोकांनीं चांगलें केलें. सात आठ दिवस यांनीं तेथें फार सुखानें घालविले. पण चॅन्सेलर मात्र पुन्हां पुन्हां समुद्राकडे पहात होता. विलोबी आणि डरफोर्थ हे वादळ शमल्यावर वॉर्दोला येऊन लागतील असा त्याचा अंदाज होता; परंतु, त्यांचें पुढें काय झालें हें कोणालाच कळलें नाहीं. ते समुद्रांत तरी गडप झाले असावे, किंवा एकाद्या बेटाला लागून भुकेनें मरून गेले असावे. पण पुष्कळ दिवसपर्यंत चॅन्सेलरला आशा वाटत होती कीं, हे आपल्याला कोठें तरी येऊन भेटतील.

कामाचा सर्वच भार आतां चॅन्सेलवर पडला आणि त्याचें जहाज जरी आतां एकटेंच राहिलें होतें तरी, पूर्वेच्या बाजूची ही सफर तशीच चालू ठेवण्याचा निश्चय त्यानें केला. खलाशांतील कांहीं लोक कुरकुरूं लागले कीं, पुढें दिसणाऱ्या धुक्यांत आपण कोठें तरी नाहीसें होऊं, म्हणून परत घराकडे वळावें. पण चॅन्सेलरनें उत्तर केलें, "धोका आहे म्हणून भिऊन मागें वळणें हें केवळ नादानपणाचें लक्षण आहे. मेलों तरी बेहत्तर, पण हातीं घेतलेलें काम मी कदापि सोडणार नाहीं." खलाशांनाही नवा हुरूप आला आणि उत्तर किनाऱ्याच्या कांठानें ते पूर्वेकडे चालले. शेवटीं ते अशा एका टापूंत येऊन दाखल झाले कीं, जेथें रात्रच मुळीं पडेना. सर्व समुद्रांत सूर्याचा लखलखीत प्रकाश अखंड पडलेला असे! शेवटीं अतिशय ओसाड असें कोला द्वीपकल्प उजव्या हाताला टाकून ते श्वेत समुद्राच्या आश्रयाला गेले आणि तेथील कांहीं कोळ्यांनीं त्यांचीं जहाजें सध्यां जेथें आर्केजल बंदर आहे तेथें नेलीं.

गांवच्या पाटलाला या नवख्या लोकांचें थोडें भयच वाटलें. पण त्यानें त्यांना राहवून घेतलें आणि त्यांची बडदास्तही बरी ठेवली. दरम्यानच्या काळांत पाटलानें आपले कांहीं लोक इव्हॅन् व्हॅसिलीवीच म्हणजे रशियाचा तेव्हांचा झार याच्याकडे धाडले. आर्केजलपासून मॉस्को किती

तरी लांब आहे. पण तेव्हांच्या काळीं सर्वच गोष्टी बेतावेतानें चालत ! कारण दळणवळणाचीं साधनें तेव्हां सध्यांसारखीं वेगवान नव्हतीं. आपल्या देशाच्या किनाऱ्यावर कांहीं इंग्रज लोक आश्रयार्थ आले आहेत, हें ऐकून इव्हॅनला मोठी मौज वाटली; आणि त्यानें 'आपण मॉस्कोला यावें,' असें निमंत्रणच चॅन्सेलरला धाडलें. वाटेनें कित्येक नद्या लागल्या; कित्येक दलदली लागल्या. या पाहुण्यांना सरकगाडीवर घालून रशियन दूतांनीं आपल्या राजधानीला आणलें. मॉस्कोचा थाट पाहून हे इंग्रज दिपून गेले. गांवांत जिकडे तिकडे मनोरेंचे मनोरे दिसत होते. राजानें त्यांना पंक्तीला बोलाविलें तेव्हां पाहतात तों सोन्याचीं ताटें मांडलेलीं, चांदीच्या वाट्या ठेवलेल्या; आणि परिचारकांच्या अंगांत भरजरीचे कपडे असलेले !

आपलें स्वागत फार चांगलें झालें हें पाहून चॅन्सेलरला बरें वाटलें. पण आपल्या मित्रांचें काय झालें याची रुखरुख त्याला सारखी लागली होती. तो म्हणाला म्हणून, झारनें उत्तर किनाऱ्यावर ठिकठिकाणीं आपले दूत तपासासाठीं पाठवले परंतु समुद्रावर नाहींशा झालेल्या या लोकांचा कांहींच पत्ता लागेना. चॅन्सेलर आणि त्याचे लोक यांनीं हिंवाळा मॉस्को येथेंच घालाविला आणि वसंताचे वारे वाहूं लागल्यावर चॅन्सेलर इंग्लंडला परत आला. येथेंच हिंदुस्थान आणि चीन इकडच्या रोखानें निघालेली ही पहिली सफर समाप्त झाली.

सहाव्या एडवर्डनें विलोबी आणि चॅन्सेलर यांच्या बरोबर पूर्व दिशे-कडील राजांना देण्यासाठीं कांहीं पत्रें दिलेलीं होतीं. यांत एडवर्डनें म्हटलें होतें कीं, "आमचे हे दर्यावर्दी लोक तुम्हांला नापसंत असलेली कोण-चीही गोष्ट करणार नाहींत; तुमच्या कोणत्याही वस्तूला हात लावणार नाहींत. ते तुमच्यासारखेच भले लोक आहेत. म्हणून आपल्याला विनंति

आहे कीं, यांना जर कांहीं गोष्टींची वाण पडली तर आपल्या उदार स्वभावाला आणि माणुसकीला आवाहन करून असें विनवितों कीं, आपण त्यांना मदत करावी आणि त्यांना जें जें कमी पडेल तें तें द्यावें. मोबदला म्हणून त्यांच्यापाशीं असलेल्या चिजांपैकीं ज्या आपल्याला पसंत असतील त्या ते देतील. आपण आमच्या या लोकांना जें दाक्षिण्य दाखवाल तेंच आपले लोक केव्हां आमच्या किनाऱ्याला येऊन लागले तर, आम्हींही त्यांना दाखवूं." इंग्लंडच्या राजेसाहेबांच्या या विनंतीप्रमाणें रशियाच्या झारनें चॅन्सेलरला सर्व तऱ्हेचें सहाय्य केलें होतें.

ही सफर जरी संशोधनासाठीं झालेली होती तरी तिचा अगदीं मूळ हेतु व्यापार हाच होता. म्हणून चॅन्सेलर यानें झारशीं व्यापाराविषयीं बरेंच बोलणें केलें व त्याच्याकडून इंग्लंडच्या राजाला देण्यासाठीं एक पत्र घेतलें. पत्रांत झारनें म्हटलें होतें कीं, "तुमच्या देशाचीं जहाजें आमच्याकडे व्यापारासाठीं आलीं तर तें आम्हांला हवेंच आहे..तीं केव्हांही येवोत व कितीदांही येवोत; मार्ग मोकळा असला कीं त्यांनीं यावें. तीं आलीं तर आमच्या येथें त्यांना कसलीही नुकसानी पोहोंचणार नाहीं. तसेंच, इंग्लंडच्या सरकारांनीं व्यापाराचें बोलणें चालणें करण्यासाठीं एक वकील आमच्या दरबारीं धाडावा. आपल्या व्यापाऱ्यांनीं हरतऱ्हेचा माल घेऊन आमच्या देशांत यावें. आम्हीं त्यांना येथें वखारी घालूं देऊं. त्यांनीं खुशाल मालाची नेआण करावी. आमच्याकडून त्यांना कसलाही उपद्रव पोहोंचणार नाहीं." झारच्या या पत्रामुळें इंग्लंड आणि रशिया यांच्यामध्यें व्यापारी संबंध उत्पन्न झाले. यामुळें पूर्वेकडील जलमार्ग शोधून काढण्याचें काम जरी यशस्वी झालें नाहीं तरी रशियाची बाजारपेठ इंग्रजांना खुली झाली आणि हाही कांहीं सामान्य फायदा नव्हता. अर्थातच इंग्लंडमध्यें आल्यावर दरबारांत चॅन्सेलर याची मोठीच वाहवा झाली.

परंतु विलोबी व डरफूर्थ यांचें काय झालें हें अजूनही निश्चितपणें कळलें नव्हतें.

चॅन्सेलर हा रशियांत पुन्हां एक दोनदां जाऊन आला आणि उत्तर किनाऱ्याकडे झारच्या लोकांनीं विलोबीचा पुष्कळच शोध केला. शेवटीं लॅप लॅन्ड बेटावरील फिनिश जातीच्या कांहीं लोकांना त्याचा पत्ता लागला. हे लोक अर्धरानटीच होते. अंगाला रेनडिअरचीं कातडीं गुंडाळलेले हे लोक अगदीं साध्या होडग्यांत बसून वारिझ्ना नदीच्या मुखाजवळून चाललेले होते. दूर अंतरावर दोन मोठालीं जहाजें नांगरून पडलीं आहेत असें त्यांना दिसलें. जहाजाचा आकार पाहूनच ते पहिल्यांदा भ्याले! पण जहाजांवर कसलीही हालचाल नाहीं हें पाहून ते बिचकत बिचकत जवळ आले. त्यांनीं मोठमोठ्यानें आरोळ्या ठोकल्या. जहाजांच्या बाजवांवर जोरानें ठोठावलें; पण कसलाच जाब येत नाहीं असें पाहून ते वर चढून गेले. पाहतात तों एक फार भयंकर देखावा त्यांना दिसला. थंडी वाजूं नये म्हणून सर्व तक्तपोशीभर गोणपाटें पसरलेलीं होतीं. त्यांच्या आंत यांनीं डोकावून पाहिलें तो खलाशांचे सांपळे मात्र दृष्टीस पडले! कोणी दंतरोगानें मेले होते; कोणी भुकेनें मेले होते; आणि कोणी थंडीनें मेले होते. जहाजांवर थोडेसे व्यापारी आणि डॉक्टर होते तेही मरून गेलेले दिसले. मात्र विलोबीची एक दैनंदिनी तेथें सापडली. तीवरून या सर्वांचा असा दुःखकारक अंत कसा झाला हें या अर्धरानटी लोकांनीं कांहीं सुजाण माणसांना बोलवून आणलें तेव्हां बाहेरच्या जगाला कळलें.

दैनंदिनींतील हकीकतीचा सारांश असाः—

विलोबीचें जहाज वादळांत सांपडलें आणि सबंध रात्रभर लाटांच्या हेलकाव्याबरोबर कोठें तरी हेलपाटत गेलें. सकाळ झाली; आणि हा तांडेल पाहूं लागला तों समुद्र भयंकर खवळलेला दिसला; आणि प्रचंड लाटा

जहाजाच्या बरगड्यावर येऊन आदळूं लागल्या. कांहीं वेळानें त्याला दूर अंतरावर एक शीड दिसलें. धीर धरून तो तिकडे गेला तों तें डरफूर्थचें कॉन्फिडेन्शिआ जहाज आहे असें त्याला आढळून आलें. दोन्हीं जहाजें कांहीं वेळ मार्गक्रमण करीत राहिलीं. परंतु चॅन्सेलरचें जहाज त्या दोघांना कोठेंच दिसेना. म्हणून ते ठरल्याप्रमाणें वार्दो बंदराकडे निघाले. इतक्यांत पुन्हां मोठें वादळ झालें आणि जमिनीपासून ते दूर कुठल्या कुठें जाऊन पडले. कित्येक दिवसपर्यंत ते मार्गेपुढें करीत राहिले. शेवटीं पूर्वेच्या बाजूला त्यांना जमीन दिसूं लागली. परंतु तेथें जाऊन पोहोंचावें तर वाटेंत एक मोठा खडपा आड उभा होता. शिवाय जमिनीवरही वस्ती असेल असें वाटेना. म्हणून त्यांनीं आपलीं जहाजें उत्तरेकडे वळविलीं. जातां जातां ते **नोव्हाझेम्ला** या बेटाला लागले. तेथें त्यांच्यासमोर बर्फाची एक दरडच दिसूं लागली. परत वळून ते **कोला** द्वीपकल्पाकडे आले आणि वार्दोच्या रोखानें पूर्वेकडे निघाले. थंडी झपाट्यानें पडूं लागली. येतां येतां विलोबी **वार्झिना** नदीच्या मुखांत आला. १७ सप्टेंबरला नदीचे कांठ बर्फानें पूर्ण भरून गेले; आणि कोठें वसति दिसते कां म्हणून पहावयासाठीं पाठवलेले लोक हिरमुष्टी होऊन परत आले. शेवटीं या थंडींत आतां आपली धडगत नाहीं हें पाहून जवळचीं सारीं गोणपाटें त्यांनीं तक्तपोशीवर पसरलीं व अशा रीतीनें थंडीचें निवारण केलें. पण अन्नही संपत आलें; आणि गोठून गेलेल्या पाण्यांत मासेही सांपडेनात. शेवटीं दंतरोग बळावत चालला आणि आपल्या नशिबीं काय लिहिलेलें आहे हें या दुर्दैवी लोकांना चक्क दिसूं लागलें. आपले लोक पटापट मरत आहेत हें पाहून विलोबीला अतिशय दुःख होऊं लागलें. ही मरामर चार महिने चालली होती. पुढील वर्षाचा जानेवारी महिना उगवला. विलोबीनें कशीबशी तग धरली होती. वसंतऋतु आला पण त्याचाही

कांहीं उपयोग झाला नाहीं. विलोबी आणि त्याचे उरले सुरले लोक यांच्या शक्ती जलदीनें घटत चालल्या आणि लवकरच त्या सर्वांनीं प्राण सोडला."

विलोबीच्या या करुणास्पद मृत्यूची हकीकत इंग्लंडांत पोहोंचली तेव्हां सारा देश त्याच्यासाठीं अतिशय हळहळला. पण त्या तिघां तांडेलांपैकीं चॅन्सेलर हा एकटा तरी आर्केंजलपासून मॉस्कोपर्यंत म्हणजे जवळ जवळ १५०० मैल पर्यंत– घसरगाडीचा प्रवास दोनदां करून परत आला होता. त्यानें झारचा स्नेह संपादन केला होता; आणि मॉस्कोची बाजारपेठ इंग्लंडला खुली झाली होती. एवढ्यावर इंग्लंडनें समाधान मानून घेतलें.

पूर्व दिशेकडून हिंदुस्थान आणि चीन इकडचा मार्ग शोधून काढण्याची ईर्षा मात्र इंग्रज लोकांनीं इतकें झालें तरी सोडली नाहीं. पुढें तीन वर्षांनीं स्टीफन्सन्बरो या नांवाचा एक तांडेल याच कामासाठीं निघाला. सर्चे थ्रीफ्ट हें त्याचें जहाज म्हणजे एक साधा पडाव होता! पण बर्फाच्या खडप्यानें भरलेल्या पाण्यांत प्रवास करण्याकरतां मोठ्या जहाजांपेक्षां असल्या छोट्या पडावांचाच जास्त उपयोग होतो. नॉर्वेच्या उत्तरेकडील नॉर्थ केपला पोहोंचल्यावर आणखी एका लहानशा नावेंत बसून तो पूर्वेच्या रोखानें निघाला. पेटचोरा नदीचें मुख, वैगास बेट आणि नोव्हाझेम्ला यांच्या आसपासच्या पाण्यांतून तो थोडा पुढें गेला; पण पाण्याचा जोर पाहून तो जलदीनें पश्चिमेकडे परत आला.

स्टीफन्सनबरो परत येण्याच्या आधींच दुसरा एक मोठा धाडसी प्रवासी चीन देशाला भूमीवरूनच वाट काढावी, अशा हेतूनें इंग्लंडांतून बाहेर पडला होता. याचें नांव ॲन्थानी जेंकिन्सन्. या व्यापारी पेशाच्या माणसानें

सर्व युरोपभर दहा वर्षें भ्रमन्ति केलेली होती. तो तुर्कस्थानांतही राहिला होता आणि ख्रिस्ती लोकांना इकडले लोक कसे वागवतात हें त्याला चांगलें माहित झालें होतें. या अनुभवाचा फायदा आपल्याला चांगला होईल हें पाहून त्यानें प्रथम मॉस्कोला जाण्याचें ठरविलें. आतांपर्यंत मॉस्कोच्या प्रवासाचें भय नाहीसें झालें होतें. झारनें जेंकिनसनची बडदास्त चांगली ठेवली आणि तार्तरीस जावयास त्याला परवानाही दिला. परंतु या परवान्याचा फारसा उपयोग होण्यासारखा नव्हता; कारण झार इव्हॅन यांची सत्ता व्होल्गा नदीच्या पलीकडे फारशी गेलेलीच नव्हती. तथापि जॉनसन् या नांवाचा एक इंग्रज माणूस आणि एक तार्तर दुभाष्या असे दोघे बरोबर घेऊन १८५८ च्या एप्रिल महिन्यांत जेंकिन्सन् मॉस्कोहून निघाला आणि व्होल्गेंतून खालीं जात जात तिच्या मुखावरील **अस्त्राखान** या किल्ल्यावर आला. त्याच्यापाशीं व्यापाराच्या नाना चिजा भरलेल्या होत्या. अस्त्राखान येथें तो तीन आठवडे राहिला आणि तेथल्या घाणीला कंटाळून एका पडावांत बसून तो **कॅस्पियन** समुद्रांत शिरला. महिनाभर तो याच समुद्रावर होता. एकदां कांहीं समुद्रचोरांनीं त्यांच्यावर हल्ला केला आणि या ख्रिस्त्यांना मारावयाचें ठरविलें. पण एका हाजीनें—मक्केच्या यात्रेकरूनें-त्यांना सांगितलें कीं, नावेंत कोणीही काफर नाहींत. म्हणून जेंकिन्सन् बचावला. कॅस्पियनच्या पूर्व किनाऱ्यावर उतरल्यावर एक हजार उंटांचा एक मोठा व्यापारी तांडा त्याला भेटला. हा तांडा बुखारा शहराकडे चालला होता. त्यांच्याबरोबर जेंकिन्सन्ही आपल्या सामानसुमानासह निघाला. थोडेसे पुढें जातात तों पलीकडल्या एका पुंडाच्या घोडेस्वारांनीं यांच्यावर हल्ला केला आणि लुटालूट आरंभिली. जेंकिन्सन् स्वस्थ बसला नाहीं. लूट घेऊन परत चाललेल्या लोकांच्या मागोमाग तो त्या पुंडांच्या बरोबर गेला आणि 'माझा माल मला परत द्या' असें तावातावानें म्हणूं

लागला. हा एक निराळाच दिसणारा माणूस निर्भयपणानें आपल्या मकाणांत येतो आणि आपला माल परत मागतो यांचें त्या पुंडांच्या नायकाला मोठें कौतुक वाटलें आणि त्यानें त्याचा माल परत केला. नंतर जेंकिन्सन् उंटांच्या तांड्याला परत येऊन मिळाला !

तेथून वीस दिवसपर्यंत एक तांबड्या वाळूचें रेताड तुडवीत तुडवीत, हा तांडा **खिवा** शहराला येऊन पोहोंचला. वाटेनें विहिरींतील थोडेसें मचूळ पाणी कोठें कोठें मिळत असे. तहानेनें घोपलेली ही प्रजा **खिवा** येथें थोडी विराम पावली. जेंकिन्सन् यांचें या लोकांनीं चांगलें स्वागत केलें. पण त्याला हा गांव इतका भिकार वाटला कीं, ' चार दमड्यांना सुद्धां हा कोणी विकत घेणार नाहीं ' असें त्यानें लिहून ठेवलें आहे !

खिवा सोडल्यावर पुन्हां एक मोठें वाळवंट त्यांना लागलें. वाटेंत घोडेस्वारांच्या एका चोरांच्या टोळीनें त्यांच्यावर हल्ला केला आणि ' गठ्ठी छोडो ' म्हणून हुकूम केला. पण न दबकतां जेंकिनसन आणि त्याचे मित्र यांनीं बंदुका झाडावयास आरंभ केला व त्यांचीं या चोरट्यांशीं लढाईच जुंपली. सकाळपासून संध्याकाळपर्यंत हा झगडा जोरानें चालला तेव्हां चोरटे तडजोडीची भाषा बोलूं लागले. रात्रीच्या वेळांत उंटांचा तांडा लुटावा असा त्यांचा बेत होता. पण हे चांगले जागरूक राहिल्यामुळें तो डावही फसला. शेवटीं या प्रवाशांनीं चोरट्यांच्या तोंडावर कांहीं माल टाकला आणि आपली सुटका करून घेतली. होतां होतां नाताळाच्या शेवटीं दोन दिवस हा तांडा **बुखारा** शहराला येऊन पोहोंचला.

येथें तर धर्मवेड्या मुसलमानांचा मोठाच अड्डा होता आणि तेथला अमीर तर शुद्ध रानवट होता. बुखारा शहरसुद्धां खिवाहून फारसें चांगलें होतें असें नाहीं. इतरांचें कांहींही असो, अमीर त्याच्याशीं फार चांगला

वागला. पण येथून पुढें चीन देशाच्या रोखानें जाणें जेंकिनसन्‌ला शक्य दिसेना. कारण खुद्द बुखारा शहरालाच समरकंद्‌चा अमीर लवकरच वेढा घालणार आहे अशी वार्ता येऊन ठेपली. इराणकडे वळावें, तर तेंही शक्य दिसेना. शेवटीं आल्या वाटेनें जेंकिनसन् स्वदेशाकडे निरुपायास्तव परत वळला. चीन आणि हिंदुस्थान या देशांकडे भूमीवरची वाट शोधून काढण्याचा इंग्रज राष्ट्रानें केलेला हा प्रयत्न अशा रीतीनें बुखारा येथेंच स्थगित झाला. पुढें इंग्रजांचीं जहाजें केप ऑफ् गुडहोपकडून हिंदी महासागर आणि चिनी समुद्र इकडे येऊन पोहोंचलीं तेव्हांच या देशांत त्यांचा प्रवेश झाला.

---

# फ्रोबिशर, डेव्हिस् व हडसन्

इं.लंडमधून बाहेर पडून ईशान्येच्या दिशेनें वर जाऊन, युरोपाच्या कांठाकांठानें पूर्वेकडे गेलें असतां, चीन आणि हिंदुस्थान या देशांचे मार्ग सांपडतील ही कल्पना जरी खरी असली, तरी तिचें खरेंपण सिद्ध होईना. म्हणून इंग्लंडांतील धाडसी तांडेलांना असें वाटूं लागलें कीं, वायव्य दिशेनें अमेरिका खंडाच्या उत्तर किनाऱ्यानें पश्चिमेकडे जात राहिलें, तर शेवटीं केव्हां तरी, एखाद्या मोठ्या सागरांत आपण उतरूं व तेथून त्या दिशांची वाट आपल्याला सांपडेल. ही कल्पना सुद्धां मूलतः चुकीची नव्हती; परंतु युरोपच्या उत्तर किनाऱ्याकडील समुद्रांत सफर करणें जितकें धोक्याचें आहे, त्याहीपेक्षां अमेरिकेच्या उत्तर किनाऱ्याकडील सफर अधिक धोक्याची आहे, हें या लोकांच्या नीट ध्यानांत आलेलें नव्हतें. साहसी खलाशी अशा प्रकारचीं कामें केवळ साहसाची आवड म्हणून हातीं घेत. त्यांच्यापैकीं कांहीं थोड्यांना संशोधनाचें महत्त्वही पटलेलें असे. पण बरेचसे लोक सोनें, रुपें सांपडेल अशा आशेनें बाहेर पडत. व्यापारी लोक त्यांच्या या बेताला प्रोत्साहन देत, याचें कारण तरी इतकेंच कीं, नवा माल आणि नव्या बाजारपेठा या साहसामुळें हस्तगत होतील असें त्यांना वाटलें आणि उभयतांच्याही मनांत धर्मप्रचाराची वासनाही असे.

वायव्येच्या बाजूनें जावयाचें असें ठरल्यावर १५७४ त मार्टिन फ्रोबिशर याच्या हाताखालीं जहाजांचा एक लहानसा ताफा तिकडील पर्यटणाला तयार झाला. हा फ्रोबिशर चांगला केला सवरलेला माणूस होता. १५५४त त्यानें गिनीची सफर केली होती आणि १५७१ त त्यानें आयर्लंडला प्रदक्षिणा घातली होती. राणी एलिझाबेथ हिनें अशा या फ्रोबिशरला संशोधनाचा परवाना दिला; आणि १५७६ जून ७ ला फ्रोबिशर बंदरांतून बाहेर पडला. या वेळीं राणीसाहेब जातीनें उपस्थित होत्या; आणि खलाशी लोकांना, जेव्हां त्यांनीं सलाम केला तेव्हां त्यांना मोठी फुशारकी वाटली.

जुलैच्या ११ तारखेला **ग्रीनलंडमधील केप फेअरवेल** या ठिकाणीं फ्रोबिशर पोहोंचला. येथें त्याच्या जहाजांना बर्फाच्या खडप्यांचा गराडा पडला. २८ तारखेला तर त्याला जागचें हलतांच येईना. थोडेसें पुढें जातात तों ते **लॅब्राडोअर** बेटाला पोहोंचले. ऑगस्टच्या पहिल्या तारखेस बर्फांचे एवढाले खडपे समुद्रांत कोसळूं लागले कीं, आपण त्यांच्या खालीं सांपडून मरून जाऊं अशी धास्ती यांना वाटूं लागली. त्यांच्या दोन जहाजांपैकीं एक येथून मुकाट्यानें परत वळलें आणि **ब्रिस्टल** येथें पोहोंचल्यावर त्यावरील खलाशांनीं असें वृत्त पसरविलें कीं, फ्रोबिशर केव्हांच बुडून मेला आहे. तो स्वतः मात्र तसाच पुढें चालला होता.

जातां जातां त्याला असें वाटूं लागलें कीं, शेवटीं ज्या महान् सागरांत आपल्याला उतरावयाचें आहे त्याला जाऊन मिळणाऱ्या एका सामुद्रधुनींत आपण जाऊन पोहोंचणार आहोंत. म्हणून त्यानें या सामुद्रधुनीला **फरोबिशर सामुद्रधुनी** असें आपलेंच नांव दिलें. उजव्या हाताला असलेली भूमि आशिया खंडाची असावी; आणि डाव्या हाताची अमेरिकेची असावी असें अनुमान त्यानें केलें. वास्तविक पाहतां आशियाखंड अजून हजारों मैल दूर होतें. परंतु पृथ्वीचा पल्ला किती याची पुरती ओळख नसल्यामुळें आपण पॅसिफिक्च्या नजिक येऊन ठेपलों आहों

असें त्याला वाटूं लागलें. तो पुढें पुढें गेला. पण त्याला वाटत असलेल्या सामुद्रधुनीचें पुढलें टोंकच त्याला लागेना. इकडल्या प्रदेशांत एस्किमो जातीचे लोक त्यानें पहिल्यानें पहिले. यांच्याशीं त्यानें मैत्री केली. तो त्यांच्या वस्तींत जाऊन आला आणि कांहीं कातड्यांची खरेदीही त्यानें केली. परंतु पुढें हे एस्किमो लोक त्याच्याशीं फार दगलबाजीनें वागूं लागले. फ्रोबिशर येथून परत फिरला आणि २ ऑक्टोबरला इंग्लंडला परत आला. तेथें त्याची मोठी वाहवा झाली आणि चीन देशाचा मार्ग त्यानें जरी प्रत्यक्ष शोधून काढला नसला तरी तो तिकडून निघणें शक्य आहे असें त्यानें दाखवून दिलें, हीच त्याची मोठी कामगिरी होय असें ठरलें. येतांना फ्रोबिशरनें बरोबर कांहीं काळे पाषाण आणले होते. या पाषाणांत खूप सोनें आहे असें व्यापाऱ्यांनीं ठरविलें म्हणून पुन्हां जमवा-जमव करून १५७७ मध्यें त्यांनीं फ्रोबिशर याला त्याच बाजूला पुन्हां एकदा धाडलें. मात्र त्यांनीं त्याला सांगितलें कीं, ‘ चीन देशाकडला मार्ग शोधून काढण्यापेक्षां या दूरच्या भूमींत सोन्याचा शोध लागतो कीं काय हें पाहण्यासाठीं आम्हीं तुला पाठवीत आहों. ’

मायकेल् आणि ग्रॅब्रिअेल् हीं दोन जहाजें आणि एलिझाबेथ राणीनें दिलेलें एड नांवाचें तिसरें एक जहाज बरोबर घेऊन तो पुन्हां वायव्येकडे निघाला. आतां मार्ग माहीत झालेला असल्यामुळें तो लवकरच फ्रोबिशर सामुद्रधुनीच्या तोंडाशीं जाऊन पोहोंचला. तिचें तोंड बर्फानें भरलेलें असल्यामुळें त्याला आंत शिरतां येईना. फ्रोबिशर शेजारच्या भूमीवर उतरला आणि बरोबर आणलेल्या सोनपारख्यांनीं तेथें सोन्याचा शोध सुरू केला. आजूबाजूला शेजारच्या बेटांवर शोध करतां करतां, यांना तेथें बरीच सोन्याची माती सांपडली. या बेटावरही तेथील रानटी लोकांशीं फ्रोबिशरला पुष्कळच भांडण करावें लागलें आणि आपल्यावर कांहीं तरी मोठा प्रसंग

गुदरेल, असें त्याला वाटूं लागलें. एड जहाजाला या भांडणांत खरोखरच आग लागली; आणि ती हे विझावितात तोंच बर्फाचा एक मोठा थोरला लोंढा तीनही जहाजांवर येऊन कोसळला. सुदैवानें जुलै २३ ला हें सगळें बर्फ नाहींसें झालें आणि फ्रोबिशरचीं जहाजें सामुद्रधुनींत शिरलीं.

या सामुद्रधुनींतील एका बेटावर फ्रोबिशरला चांदीची खाण सांपडली. पण चांदी खणून काढणें त्याला फार अवघड दिसूं लागलें. दुसऱ्या एका बेटावर सोन्याची मातीही सांपडली. थोडें पुढें जातांच एक नवी भूमि लागली. फ्रोबिशरला वाटलें कीं हें अमेरिका खंडच असावें. म्हणून त्यानें तेथें एलिझाबेथ राणीचें निशाण रोवलें आणि ते सारे पुढें चालले.

पुढें लागलेल्या बेटाला त्यांनीं **वॉरविक बेट** असें नांव दिलें. येथें त्यांना रगड सोन्याची माती सांपडली. येथें त्यांना बातमी लागली कीं, पलीकडे असलेल्या एका उपसागराच्या कांठीं कांहीं मरून गेलेल्या इंग्रज खलाशांचीं वस्त्रें आणि पात्रें आहेत. शोध करावा म्हणून फ्रोबिशरनें आपले लोक तिकडे धाडले तों तेथें लढाईलाच तोंड लागलें ! या इंग्रजांचे बाण त्या रानटांच्या अंगांत भराभर घुसूं लागले. शेवटीं यांच्या हातांत पडावयाच्या ऐवजीं त्या रानटी लोकांनीं समुद्रांतच उड्या टाकल्या. त्यांच्यापैकीं दोन बायका आणि एक पोर या पाहुण्यांच्या हातीं लागलें. त्यांतली एक बाई म्हातारी कुरूप कुब्जा होती. इंग्रज खलाशांना वाटलें कीं, ही सैतानाची लेक असावी आणि नसली, तर निदान चेटकी तरी असावी. त्यांनीं तिच्या पायांतील पायताण काढून पाहिलें. त्यांचा अंदाज असा होता कीं, तिच्या पायाला गेळीं पडलेलीं असावीं; परंतु माणसासारखेंच पाय आहेत असें पाहून त्यांनीं तिला सोडून दिलें. सोन्याची २०० टन माती घेऊन फ्रोबिशर इंग्लंडकडे परत वळला. राणीसाहेबांनीं त्याची फारच वाहवा केली. पुढें ही माती भट्टींत घेऊन पाहिली, तेव्हां असें

दिसून आलें कीं, या मातीला कवडीचीही किंमत नाहीं ! पण व्यापाऱ्यांचा लोभ अजूनही सुटला नव्हता ! पंधरा जहाजें तयार करून त्यांनीं तीं फ्रोबिशरच्या हवालीं केली. राणीसाहेबांनीं त्याला भेटीला बोलाविलें; त्याला सोन्याचा गोफ बक्षिस दिला आणि आनंदानें निरोप दिला.

हें पर्यटण १५७८ मे ३१ ला सुरू झालें. या खेपेला फ्रोबिशर आयर्लंडच्या दक्षिणेकडून गेला. ठरल्याप्रमाणें त्या पूर्वीच्या सामुद्रधुनी-कडे तो चालला पण वादळांत त्याची वाट चुकली आणि तो एका निराळ्याच सामुद्रधुनींत शिरला. हिलाच पुढें **हडसन् सामुद्रधुनी** असें नांव मिळालें. आपण वाट चुकलों आहों हें फ्रोबिशरला कळून चुकलें होतें. पण तो गप्प बसला; आणि कोणाला आन्देशा येत आहे असें दिसलें तर तो संभवितपणें सांगूं लागला कीं, ही आपली नेहमींचीच वाट आहे. तथापि वादळावादळांनीं त्याच्या जहाजांची फार हानी झाली; वाट हुडकण्यांत पुष्कळच वेळ गेला; आणि शेवटीं तो **वॉरविक** बेटा-पाशीं आला. सगळ्या लोकांनीं सोन्याची माती पाहण्याची आतां शिकस्त केली. शेवटीं एका बेटावर ही माती इतकी सांपडली कीं, 'एवढ्यावर जगांतले सगळे लोभी लोक संतुष्ट होतील' असें फ्रोबिशर म्हणाला. त्यांनीं जहाजें मातीनीं भरून घेतलीं; आणि संशोधनासाठीं आतां पुढें जावें, असें कोणाच्याच मनांत नसल्यामुळें फ्रोबिशर स्वदेशाकडे परत वळला. ऑक्टोबर १ ला घरीं आल्यावर पुन्हां एकदां त्याची फजीती झाली ! बरोबर आणलेले सोन्याच्या मातीचे ढिगारे कवडी किंमतीचे आहेत, असें जाणत्या माणसांनीं ठरविलें. बरोबर नेलेल्या सोनपारख्यांनीं त्याला चक्क फसविलें होतें. व्यापाऱ्यांनीं घातलेला पैसा आणि या खलाशांनीं सोसलेले हाल या मातीच्याच मोलाचे ठरले आणि फ्रोबिशर याची केवळ बेअब्रू झाली. अर्थातच कांहीं दिवसपर्यंत वायव्येकडे जाण्याला कोणाचेंच मन घेईना.

---

# जॉन डेव्हिस्

फ्रोबिशरच्या मागून त्याच दिशेनें प्रयत्न करणारा पुढचा प्रसिद्ध नावाडी म्हणजे जॉन डेव्हिस हा होय. सर फ्रान्सिस वॉल्सिंगहॅम् आणि दुसरे कांहीं व्यापारी यांनीं पैशांची तरतूद केली. कारण अमेरिकेच्या उत्तरेकडून पूर्वेकडे जाण्याच्या कामांत यश मिळालेंच पाहिजे असा त्यांचा विश्वास होता. त्यांनीं दोन जहाजें तयार केलीं आणि तीं जॉन् डेव्हिस याच्या हवालीं केलीं. १५८५ जून ७ ला, डेव्हिसनें इंग्लंडचा किनारा सोडला आणि २० तारखेच्या सुमारास तो ग्रीनलंडला जाऊन पोहोंचला. हें ग्रीनलंड त्याला इतकें वैराण दिसलें कीं, त्याला त्यानें 'वैराण भूमी' असेंच नांव दिलें. परंतु केप् फेअरवेल् याला वळसा घालून तो पश्चिमेला गेल्यावर त्याला कांहीं लहान लहान बेटें भेटलीं. तीं मात्र मोठीं हिरवींगार दिसलीं. तेथल्या लोकांच्या बोलण्यावरून त्याला असें दिसून आलें कीं, वायव्येच्या बाजूनें दूर गेले म्हणजे एक प्रचंड महासागर लागतो. आपल्याला ज्या पॅसिफिक महासागरांत उतरावयाचें आहे तोच हा असला पाहिजे असें मनाशीं ठरवून डेव्हिस् त्या रोखानें निघाला. कांहींसें पुढें गेल्यावर, त्याला दिसून आले कीं फ्रोबिशरनें धडक खाल्ली होती त्याच्या पलीकडे आपल्याला थोडेसेंच अंतर काटतां आलें आहे; पण तें पुरतें काटलें म्हणजेच आपण पॅसिफिकमध्यें उतरूं. तो कदाचित्

पुढें गेलाही असता. पण नावेंतील अन्न संपूं लागलें आणि लोक कुरकुरूं लागले. म्हणून डेव्हिस परत तडक निघाला आणि सप्टेंबर २९ ला स्वदेशाला परत आला.

परत आल्यावर त्यानें आपल्या पराक्रमाची पुष्कळच हकीकत फार सुरसपणानें वॉलसिंगहॅम् इत्यादि मंडळींना सांगितली आणि सांगतां सांगतां तो असेंही म्हणाला कीं, ' पॅसिफिक महासागराचा वायव्येकडील मार्ग मीं शोधून काढला आहे असेंच तुम्हीं समजा. सामुद्रधुनीचें पश्चिमेकडील तोंड जरी अजून सांपडलें नसलें तरी हें काम आतां माझ्या आटोक्यांत आलें आहे. व्यापारी मंडळींनीं पुन्हां पैसा उभा केला. चार जहाजें सिद्ध केलीं आणि त्यावर सहा महिन्यांचा शिधा भरला. डेव्हिसला त्यांनीं सांगितलें कीं सामुद्रधुनीचें पश्चिम तोंड तर आतां सांपडलें पाहिजेच; पण या तोंडांतून अमेरिकेच्या पश्चिम बाजूला असलेल्या या समुद्रांत प्रत्यक्ष शिरूनच तूं आतां परत ये.

१५८६ त डेव्हिस पुन्हां निघाला आणि जूनच्या २९ तारखेला तो ग्रीनलंडच्या किनाऱ्याला येऊन लागला. तेथून पुढें ठरलेल्या सामुद्रधुनीं-तून तो वायव्येकडे चालला. एका बेटावर त्यानें एस्किमो लोकांशीं स्नेह-संपादन केला आणि कांहीं विशेष प्रकारचीं कातडींही खरेदी केलीं. पण हळूहळू त्याला दिसून आलें की हे लोक चोरटे आहेत. डेव्हिसच्या लोकांना कळूं न देतां ते यांच्या जहाजांच्या दोऱ्या कापूं लागले; वल्हीं पळवूं लागले; आणि त्यांचे वाळत घातलेले कपडेही ते घेऊन गेले. त्याच्या बरोबरच्या जहाजांत कांहीं फाटाफूटही झाली; आणि हा एकटाच उत्तर अमेरिकेच्या किनाऱ्यानें बराच दूरवर गेला. पण इतक्यांत समुद्रावर येवढालीं वादळें उठलीं कीं, परत फिरणेंच बरें असें त्याला वाटूं लागलें.




जॉन डेव्हिस व हेन्री हडसन यांचीं वायव्य समुद्रांतील पर्यटणें.

बरेचसे कॉड मासे बरोबर घेऊन मे महिन्याच्या १९ तारखेला तो इंग्लंडला परत आला.

पुढल्या वर्षी डेव्हिस यानें आपली तिसरी सफर सुरूं केली. ठरलेल्य वाटेनें त्या सामुद्रधुनींत तो शिरला. पण त्याच्या नावेला भोकें पडलीं आणि पाणी आंत येऊं लागलें. पाणी उपसून टाकण्याचा झपाटा त्यानें सुरूं केला. तो म्हणाला, "आतां मेलों तरी बेहत्तर, पण अपेश घेऊन मी घरीं परत जाणार नाहीं." पुढें जातां जातां बॅफिल् उपसागरावरील एका डोंगराच्या किनाऱ्याला तो लागला. लॅब्राडोर बेटापाशीं गेल्यावर भयंकर वादळानें त्याला गांठलें.

पूर्वी दुसरे कोणीही गेलें नव्हतें इतका दूरवर तो गेला; आणि थेट उत्तरेकडे न जातांना तो थोडा पश्चिमेच्या बाजूनें वळला; तेव्हां त्याला एक मोठा विशाल सागर आपल्यापुढें पसरला आहे असें दिसून आलें. पॅसिफिक् तो हाच असावा; व म्हणून जिचा शोध करण्याची धडपड आपण करत होतों ती वाट सांपडली आहे असें ठरवून डेव्हिस परत आला. उत्तर अमेरिकेच्या कोणत्याही नकाशांत त्याच्या नांवाचे उपसागर, बेटें, सामुद्रधुन्या असे अनेक स्थलविशेष सांपडतील. हे सारे त्यानेंच हुडकून काढलेले आहेत. म्हणून इकडील संशोधनाच्या कामांत डेव्हिसचा महिमा फार मोठा समजतात. यानंतर त्याचा पोशिंदा वॉलसिंगहॅम हा मरण पावला आणि डेव्हिस्नें संशोधनाचा नाद सोडून दिला.

---

# हेन्री हडसन्

यानंतरचा इकडचा मोठा संशोधक नावाडी म्हणजे हेन्री हडसन् हा होय. पहिल्यापासूनच समुद्राचा वारा पिण्याची याला संवय लागली होती. चीन देशाला पोहोंचावयास युरोपच्या किंवा अमेरिकेच्या उत्तर किनाऱ्यानें जावयास हवें ही कल्पनाच या धाडसी माणसानें टाकून दिली. थेट उत्तर ध्रुवाच्या प्रदेशांत शिरावें आणि तेथून आशिया खंडाच्या किनाऱ्याला लागावें असें यानें ठरविलें. अर्थात् तेव्हांच्या दिवसांत हें काम सर्वथा अशक्य होतें. पण हा त्या रोखानें गेल्यामुळें स्पिट्स् बर्जन् हें बेट त्यानें शोधून काढलें. याच कामासाठीं तो पुढल्या वर्षी पुन्हां एकदां गेला; पण तेव्हांही त्याला अपयशच आलें.

१६०९ या वर्षी कांहीं डच लोकांनीं त्याला नोकरीला ठेवलें आणि अमेरिकेच्या उत्तर किनाऱ्याकडे पाठविलें. लाँग आयलंड आणि प्रत्यक्ष अमेरिकेची भूमि यांच्यामधून पुढें जातां जातां तो एका मोठ्या नदीच्या मुखांत शिरला. हीच ती सध्यांची हडसन् नदी होय. एकादें गांव वसवावयास हें ठिकाण फार सुंदर आहे असें जहाजावरच्या डच लोकांना वाटलें. म्हणून तेथल्या रेड इंडियन लोकांना सुमारें ५० रुपयांचा भरेल येवढा माल देऊन त्यांनीं तें सारें क्षेत्र विकत घेतलें आणि त्याच्यावर एक नवें गांव वसवून 'नवें आमस्टरडॅम्' असें नांव त्याला दिलें. पुढें

या प्रदेशावरची सत्ता बदलली आणि या न्यू ॲमेस्टरडॅमचें न्यूयॉर्क झालें. सध्यांची अमेरिकेची राजधानी जी न्यूयॉर्क ती हीच होय.

हें काम आटोपून हडसन परत आल्यावर सर थॉमस स्मिथ आणि दुसरे कांहीं व्यापारी यांनीं हडसनला आपल्या नोकरींत घेतलें आणि फ्रोबिशर व डेव्हिस यांचें अर्धवट राहिलेलें काम पुरें करावयास सांगितलें. हडसनच्या हाताखालीं दिलेलीं माणसें अगदीं सामान्य प्रतीचीं होतीं आणि स्वतःच्या संबंधानें लोकांच्या मनांत आदर उत्पन्न करण्याचें हडसनचें वयही राहिलेलें नव्हतें. इतर कांहीं लोकांबरोबर हडसननें आपला सतरा वर्षांचा मुलगा जॅक यालाही बरोबर घेतलें होतें.

तीन आठवडेपर्यंत समुद्रांतील भ्रमन्ती झाल्यावर १६१० मे ११ ला हे लोक आइसलंडच्या किनाऱ्याला लागले. समुद्रावरचा वारा फारसा अनुकूल नसल्यामुळें १५ दिवस हडसननें तेथेंच मुक्काम टाकला आणि पर्यटनाला पुन्हां सुरवात करून ग्रीनलंड आणि डेव्हिस सामुद्रधुनी इकडे तो जाऊन पोहोंचला. पाण्याच्या हेलकाव्यांत मार्ग बदलतां बदलतां डेव्हिस सामुद्रधुनी ओलांडून तो लॅब्राडोरच्या किनाऱ्याला लागला आणि उंगावाच्या उपसागरांत शिरला. आकपाटो या नांवाचें एक लहानसें बेट त्याला लागलें. तें अतिशय सुंदर होतें. बर्फ आणि पाणी याशिवाय दुसरें कांहींच फार दिवसपर्यंत त्यांनीं पाहिलेलें नसल्यामुळें हें बेट त्यांना नंदनवनासारखेंच वाटलें. परंतु बेट चांगलें असलें तरी भोंवतालची सामुद्रिक परिस्थिति मात्र फार भयंकर होती. ती पाहून नावेवरचे लोक दचकले आणि परत फिरण्याच्या गोष्टी बोलूं लागले. हडसननें साफ सांगितलें कीं, "परत फिरण्याची गोष्टच माझ्यापुढें काढूं नका." अर्थात् ते वेगानें पुढें चालले.

ऑगस्टच्या २ तारखेला २००० फूट उंचीचा एक मोठा कडा त्यांना दिसला. वूलस्टनहोम असें नांव त्यांनीं या भूशिराला दिलें; आणि दुसऱ्या

एका अशाच उंच सुळक्याला डडले डिग्ज असें नांव त्यांनीं दिलें; आणि जहाजावरची कांहीं मंडळी जमिनीवरती उतरली.

जमिनीवर जिकडे तिकडे दलदली पसरलेल्या असून पाय टाकावा तेथें आपण गडप होऊं असें या लोकांना वाटूं लागलें. सुदैवानें एक मोठा दगडांचा ढिगारा त्यांना दिसला. त्याच्या आंत पाहतात तों एस्किमो लोकांनीं मारून ठेवलेलीं हजारों पाखरें त्यांना दिसलीं. इतकें ताजें मांस आयतेंच हातांशीं लागलेलें पाहून सारेच नावाडी अगदीं हरखून गेले. पण इतक्यांत दाट धुकें पडलें; इतकें कीं, डोळ्यांत बोट घातलें तरी दिसेना. शेवटीं मोठमोठाल्या आरोळ्या ठोकून ते एकमेकांच्या जवळ आले. पण समुद्रकांठीं येऊन पाहतात तों जहाज बेपत्ता झालें आहे असें त्यांना दिसलें. वादळांत आणि धुक्यांत ते कोठेंतरी हेलपाटत गेले होते. किनाऱ्यावर उतरलेले लोक भांबावून जातील हें ओळखून हडसननें जहाजावरून मोठमोठाले बार काढले आणि आपण जवळच आहों असें सुचविलें. होता होतां सर्वांच्या गांठी पडल्या. पण येथूनच पुढें हडसनच्या दुर्दैवाला सुरवात झाली.

डिग्ज बेट सोडल्यावर त्यांना एक अफाट महासागर समोर दिसूं लागला. तो पश्चिमेकडे आणि दक्षिणेकडे दूरवर पसरला आहे असें पाहून हाच तो पॅसिफिक् समुद्र असें त्यांनीं ठरविलें. खरी गोष्ट अशी होती कीं, अमेरिकेच्या उत्तर किनाऱ्याची लांबी किती आहे याची यथार्थ कल्पना या लोकांना नव्हती. म्हणून हा किनारा संपवून आपण पॅसिफिकमध्यें येऊन ठेपलेलों आहों असें त्यांना वाटूं लागलें. भूमीच्या कांठाकांठानेंच डिसकव्हरी जहाज चाललेलें होतें. आतां हडसन् जेम्स उपसागरांत शिरला. पण इकडून तिकडे, तिकडून इकडे असें कितीदां केलें तरी या उपसागरांतून त्याला बाहेर पडतां येईना. मुख्य तांडेल कांहींसा बावरलेला

पाहून खलाशी बंड करून उठले. त्यांचा म्होरक्या ज्यूएट नांवाचा नावेवरचा एक दुय्यम अधिकारीच होता. हडसननें त्याला पकडलें. त्याच्यावर खटला केला आणि त्याला कामावरून दूर केलें. अजूनही याच बाजूनें कोठेंतरी वाट सांपडेल अशी त्याची कल्पना होती. इतक्यांत हिंवाळा येऊन ठेपला.

चीन देश अजून दूरच होता आणि स्वदेश लांब राहिला होता. काय करावें अशा दुग्ध्यांत सारे पडले. असें ठरलें कीं, शेजारच्या किनाऱ्यावर एक झोपडी बांधावी आणि तेथेंच हिंवाळा काढावा. मोठ्या प्रयासानें लोकांनीं ही झोपडी उभी केली आणि हडसननें कांहीं लोकांना शिकारीसाठीं बरेंच आंत धाडलें; पण हिंवाळ्याच्या आगमनामुळें रेनडियर इत्यादि पशू नाहींसे झाले होते. आणि बर्फानें वाटा बुजल्यामुळें शिकारीसाठीं कोणीकडे जावें याचें या लोकांना कोडेंच पडलें ! कांहीं थोडीं पाखरें यांनीं मारून आणलीं पण तेवढ्यानें भागेना. हळूहळू खलाशी म्हणूं लागले कीं, ‘ पाय दुखत आहेत. ’ त्यांच्या हातापायांना सूज येऊं लागली आणि त्यांवर गळवें उठलीं. सगळ्या झोपडींत स्कर्व्ही रोग सुरू झाला. एकजण तसाच आंतवर गेला. एका झाडाला असलेल्या कांहीं कळ्या त्याला सांपडल्या. त्यानें त्या शिजवून सर्वांना दिल्यावर स्कर्व्ही बरी झाली.

पण थंडीचा कडाका, पोटांत भूक, डोक्यावर वादळाची झिम्मड, घरच्या आठवणी यांनीं हे लोक अगदीं बेजार होऊन गेले. होतां होतां वसंत ऋतु आला आणि बर्फ हळूहळू वितळूं लागलें. अशा वेळीं त्यांच्याकडे एक रेड इंडियन आला. यांनीं त्याला एक चाकू, कांहीं बटणें व एक आरसा अशा वस्तू दिल्या. त्यानेंहि परतभेट म्हणून कांहीं हरणांचीं कातडीं आणि थोडें मांस दिलें. पण हे लोक लबाड आहेत असा त्याचा समज झाला आणि तो जो गेला तो पुन्हां परत आलाच नाहीं ! तथापि

कांहीं अंतरावर या इंडियन लोकांची एक वसाहत होती. त्यांच्याकडे जाऊन कांहीं साहाय्य मागावें असें ठरवून चारदोन दिवसांचा शिधा बरोबर घेऊन हडसन त्या बाजूला गेला. हे 'लघ्राड पाहुणे' आपल्याकडेच येत आहेत असें पाहून हे रेड इंडिअन्स बुजले आणि भोंवतालच्या झाडाझुडांना आगी लावून ते लांब पळून गेले. निराश होऊन हडसन परत आला.

जहाजावरच्या लोकांनीं पुन्हां बंड केलें. तथापि बर्फ वितळलें व १२ जूनला त्यांनीं जहाजें हांकारलीं. आतां हा तांडेल पुन्हां पुढें जावें असें म्हणेल हा धाक खलाशांना पडला. संशोधन त्यांना अगदीं नकोसें झालें होतें. हडसन्नें मनाशीं ठरविलें कीं, 'घराकडे जात आहों' असेंच म्हणावें; पण पश्चिमेच्या रोखानें मात्र पुढें जावें. मार्गक्रमणाला सुरवात करण्याच्या आधीं किती अन्न शिल्लक आहे हें त्यानें एकदां जोखून पाहिलें आणि त्यांतले कांहीं मण धान्य कोणाला नकळत कुलुपांत ठेवून दिलें. अगदीं जिवावर बेतलें तर तें काढावें असा त्यांचा बेत होता. खलाशांना हळूंहळूं दिसूं लागलें कीं, हा पश्चिमेच्या रोखानें चालला आहे. अर्थात् लपून छपून चाललेलें बंड आतां भडकून उठलें.

खलाशांचा असंतोष प्रखर बनावयास आणखी एक कारण झालें. जहाजाच्या भोंवतीं बर्फाचा खच एवढा पडला कीं, ते हलेना कीं डोलेना. खलाशी बेफाम बनले आणि त्यांच्या दोघां पुढाऱ्यांनीं गुप्ततेनं बंडाचीं बोलणीं सुरूं केलीं. ते म्हणाले, 'अन्न तर आतां संपत आलें आहे. आतां या हडसनचा कांटा काढल्यावांचून आपल्याला दुसरी गति नाहीं.' त्यांनीं कोणच्या तरी मिषानें हडसनला आपल्या खोलींतून बाहेर बोलाविलें. तो बाहेर येतांच थॉमस या खलाशानें आणि माथू या आचाऱ्यानें त्याच्यावर झडप घातली आणि त्याचे हातपाय बळकट धरून ठेवले.

विल्सन नांवाच्या एका माणसानें चऱ्हाटानें त्याचे हात बांधून टाकले. अशा रीतीनें हडसनचा गठ्ठा आंवळून त्यांनीं तो एका लहानशा बोटींत खालीं सोडला; आणि तेथें आधींच जाऊन बसलेल्या माणसांनीं हडसन्‌ला




तेथें गच्च धरून ठेवलें. मग त्याच्यामागून हडसनचे मित्र आणि त्याचा मुलगा जॅक् यांनाही बांधून घालून त्यांना त्या बोटींत लोटलें. स्टाफ् नांवाचा एक सुतार या बंडखोरांत होता. तो म्हणाला, ‘तुमचें म्हणणें खरें असेल. पण या हडसनूला अशा रीतीनें एका लहानशा होडग्यांत

घालून समुद्रांत लोटून दिलेलें माझ्यानें पहावत नाहीं. तुमच्या दुष्टांच्या संगतींत राहून जगण्यापेक्षां हडसनच्या संगतींत राहून मेलों तरी मला चालेल.' एवढें बोलून तो आपण होऊन त्या लहानग्या होडग्यांत उतरला. या सर्वांना डांबून धरण्यासाठीं जे दोन बंडवाले होडग्यांत उतरले होते ते तसेच तेथें राहिले ! या सर्वांना मिळून बंडवाल्यांनीं एक लोखंडी थाळा, दिवसभराचें अन्न आणि एक बंदूक दिली व ज्या दोरीनें ती बोट यांच्या जहाजाला बांधली होती ती दोरी त्यांनीं तोडून टाकली आणि आपलें जहाज वेगानें बाजूला हांकारलें. पुढें या लोकांचें काय झालें; बसल्या ठिकाणीं हे भुकेनें तडफडून मेले कां होडगें कोठें पालथें होऊन हे समुद्रांत बुडून मेले हें आजवरही कोणाला कळलेलें नाहीं. हडसन् आणि त्याचा छोटा मुलगा जॅक यांच्या संशोधनकार्याचा अंत येथेंच झाला.

इकडे जहाजावरील लोकांनीं हडसनचीं खोली उघडून पाहिली तों त्यानें बाजूस काढून ठेवलेल्या अन्नाचा सांठा त्यांना तेथें सांपडला. अर्थात् खलाशांचें अन्न तोडून या कपटी तांडेलानें दुसऱ्या कांहीं तरी हेतू-साठीं हें चोरून ठेवलें असावें असाच अंदाज त्यांनीं बांधला ! यांनीं आपलें जहाज केप डिग्जपर्यंत नेलें आणि तेथें एका एस्किमो तळाच्या शेजारीं ते उतरले. या एस्किमोंनीं त्यांच्यावर एकदमच हल्ला चढाविला. एकदोघे मरतांच कसेतरी धडपडत बाकीचे सारे जहाजावर आले, पण तरीही तेथें त्यांना एस्किमोंचे बाण लागतच होते. ज्या पांचजणांनीं हडसनची गठडी वळली होती ते पांचहीजण या बाणांनीं मरून गेले.

उरलेले थोडेसे लोक घराकडे निघाले. जवळ पुरेसें अन्न नाहीं. गोडें पाणी थोडेंच उरलेलें, भोंवतालीं आर्क्‌तिक् समुद्र पसरलेला, जहाज

वल्हवावयास दंडांत बळ नाहीं आणि घर अजून २००० मैल लांब अशा अवस्थेंत यांनीं जिवाच्या करारावर नांव कशी तरी इंग्लंडांत आणली. त्यांनीं समुद्रांतलें गवत खाल्लें; मेणबत्तींचीं उरलेलीं थोटकें चघळलीं; आणि ते कसेतरी कांठाला येऊन लागले! कानडाच्या उत्तरेकडील समुद्राकडचा कोण-चाही नकाशा वाचकांनीं पहावा. त्यांत हडसनच्या नांवाचे स्थलविशेष त्यांना किती तरी सांपडतील. अशा रीतीनें इंग्लंडांतून बाहेर पडून वायव्येच्या रोखानें पश्चिमेकडे जाऊन पॅसिफिकमध्यें उतरण्याचा यत्न निदान अर्धवट तरी यशस्वी झाला.

---

# मंगोपार्क व नायगर नदीचा शोध

आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर युरोपियन लोकांनीं आपले पाय रोवल्यानंतर पुढें कांहीं शतकें गेलीं तरी, ज्या मुख्य मुख्य नद्यांच्या मुखांवर त्यांनीं वस्ती केली होती, त्यांतून आंतल्या प्रदेशांत त्यांना जातां आलें नाहीं. १७८८ च्या सुमारास आफ्रिकन असोसिएशन या नांवाची संस्था इंग्लंडांत प्रस्थापित झाली आणि आफ्रिकेच्या आंतर भागाचें संशोधन तिनें हातीं घेतलें. याच्या आधीं आफ्रिकेंत झालेलें फार मोठें संशोधन म्हणजे जेम्स ब्रूस यानें नाईल नदीचें एक उगमस्थान शोधून काढलें हें होय. आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर आपल्या काठेवाडासारखा जो एक भाग पुढें आलेला आहे त्याच्या किनाऱ्यावर दोन तीन नद्या आंतर भागांतून येऊन समुद्राला मिळतात. त्यांची थोडी बहुत माहिती युरोपियन लोकांना झाली होती. २००० वर्षांपूर्वी हिरेडोटस याच्या ग्रंथांत आलेला या प्रदेशांतील नायगर नदीचा उल्लेखही युरोपियन लोकांच्या ओळखीचा होता. वास्तविक पाहतां ही नायगर नदी मध्य आफ्रिकेच्या पश्चिम टापूंतच उगम पावते आणि पश्चिम समुद्राला मिळते. पण ती कोठें उगम पावते आणि पुढें तिचें काय होतें हें या काळांत तरी कोणालाही कळलेलें नव्हतें. ज्यांना शास्त्रज्ञ किंवा तज्ज्ञ म्हणून समजत त्यांच्या लिखाणावरून

या नदीची कसलीही माहिती लोकांना मिळेना. म्हणून त्यांचें लिखाण बाजूला पडलें. दुसरे कोणी म्हणत कीं, ही नायगर नदी साहारा वाळ-वंटात शिरून वहात वहात शेवटीं नाईल नदीला जाऊन मिळते किंवा ती नाईलपर्यंत पोहोंचत नसली तर या वाळवंटांतच जिरत असली पाहिजे. दुसऱ्या कांहींचा अंदाज असा होता कीं, **कॅमेरून्स** पर्वतांना वळसा घालून ही नदी पुढें गेली म्हणजे तिलाच **कॉंगो** हें नांव मिळालेलें आहे. शेवटीं कांहींजणांचें म्हणणें असें कीं, पश्चिम समुद्राला मिळणाऱ्या **सेनगल** आणि **गॅंबिया** यांपैकीं एकाद्या नदीला ती मिळत असली पाहिजे. वर सांगितलेल्या आफ्रिकन असोसिएशननें या प्रश्नाचा निकाल लावावयाचें ठरविलें.

लेड्यार्ड या नांवाच्या एका अमेरिकन माणसानें हें काम आफ्रिकन असोसिएशनकडून पत्करलें. हा माणूस पायपिटी करण्यांत मोठा पटाईत होता. सबंध सायबेरिया यानें पायांखालीं घातला होता! लेड्यार्ड यानें ठरविलें कीं, प्रथम कायरो येथें जावें आणि तेथून एक उंटांचा तांडा बरोबर घेऊन नायगर नदीच्या शोधाला लागावें. तो कायरोला गेला आणि तांड्याची तयारीही झाली. परंतु इतक्यांत त्याला ताप येऊं लागला आणि तो तेथेंच मरण पावला.

यानंतर ल्यूकाज नांवाच्या एका इंग्रज माणसानें हें काम हातीं घेतलें. हा मोरोक्को देशांत पुष्कळ दिवस राहिला होता. त्रिपोलींतून तो सरळ खालीं उतरला. पण साहाराच्या वाळवंटांतून दक्षिणेकडे जाणें अशक्य आहे हें पाहून तो परत फिरला. यानंतर फ्रेडरिक हार्नेमान या नांवाच्या एका जर्माननें हें काम हातीं घेतलें. फ्रेंच लोकांनीं इजिप्तवर स्वारी केली तेव्हां हा तेथें होता. त्याची संशोधनाची ईर्षा पाहून नेपोलियननें त्याला प्रोत्साहन दिलें आणि एका कारवानाबरोबर तो दक्षिणेकडे निघाला. नाईल नदीच्या पश्चिमेकडील खडकाळ प्रदेश त्यानें ओलांडला. फेझान

येथें आल्यावर त्याला कोणी सांगितलें कीं, ' नायगर नदी नाईल नदीला जाऊन मिळते.' म्हणून दक्षिणेकडला रोख सोडून तो पुन्हां पूर्वेकडे वळला. पण पुढें या माणसाचें काय झालें हें कोणालाच कळलें नाहीं. सतरा वर्षांनंतर एका प्रवाशानें सांगितलें कीं 'हा जर्मन प्रवासी तापातापानें मरून गेल्याचें आपण पाहिलें आहे.'

असोसिएशननें निकल्स नांवाच्या आणखी एका माणसाला या कामावर नेमलें. पण तोही या कामीं मरून गेला. याच्या पुढचा बळी म्हणजे मेजर हूटन हा होय. १७९१ त तो नायगर नदीकडे निघाला. पण वाटेंत मूर लोकांनीं त्याला लुबाडलें आणि अन्नान्न दशा होऊन एका वैराणांत तो मरून गेला. शेवटीं या कामासाठीं मंगोपार्क या नांवाचा एक स्कॉटिश माणूस पुढें आला.

आफ्रिकन असोसिएशनची संशोधक पाहिजेत म्हणून जाहिरात होती. धाडसी प्रवृत्तीच्या मंगोपार्कला हा उद्योग हातीं घ्यावासा वाटला; आणि अर्ज घेऊन तो असोसिएशनकडे गेला. त्याची ती उंच काठी, भक्कम प्रकृति आणि बळकट बांधा हीं पाहून असोसिएशनच्या सभासदांनीं त्याची नेमणूक करून टाकली. वयानेंही तो अवघा २४ वर्षांचा होता. तारुण्यानें मुसमुसलेला हा माणूस कसल्याही संकटाला जुमानणार नाहीं असें असोसिएशनला वाटलें असल्यास नवल नाहीं. बांधाबांध करून १७९५ मे २२ ला मंगोपार्क पोर्टस्माऊथमधून निघाला आणि एक महिन्यांतच आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर अटलांटिक महासागराला मिळणाऱ्या गँबिया नदीच्या मुखांत येऊन पोहोंचला.

पश्चिम आफ्रिकेचा एकादा मोठा नकाशा वाचकांनीं आपल्या हाताशीं घ्यावा, म्हणजे त्यांना दिसून येईल कीं, मध्य आफ्रिका संपल्यावर या खंडाचा किनारा सरळ अटलांटिक महासागरांत शिरतो आणि बराच

दूरवर गेल्यावर तो उत्तरेकडे वळतो. आफ्रिकेला हें जें एक मोठें पोंक आलेलें आहे यांतच मंगोपार्कच्या पराक्रमाचे सगळे स्थलविशेष वाचकांना सांपडतील. या पोंकाच्या दक्षिणेकडील किनाऱ्यापासून थोडेसे मैल वर गेलें म्हणजे एक मोठा डोंगराळ प्रदेश आहे. यांतूनच अनेक लहान मोठ्या नद्या उगम पावतात. याच्या उत्तरेकडील उतरणीवरून गँबिया आणि सेनेगॉल या उगम पावलेल्या नद्या पश्चिमेकडे वहात जाऊन अटलांटिक महासागराला मिळतात. तेथूनच निघालेली फालेमा नांवाची एक नदी सेनेगॉलला जाऊन मिळते. या नद्यांच्या उगमस्थानापासून थोडीशी उजव्या हाताला नायगर नदी उगम पावते आणि ती ईशान्येकडे वहात जाऊन या पर्वताची उतरण पूर्ण संपली म्हणजे वाकण घेऊन दक्षिणेकडे उतरते. पुढें हजार आठशें मैल वहात जाऊन शेवटीं ती वर सांगितलेल्या पोंकाच्या आग्नेय कोपऱ्यांत अटालांटिकला येऊन मिळते. सेनेगॉल आणि गँबिया या दोन नद्यांच्यामध्यें पिसानिया आणि मेदिना हीं गांवें आहेत. पलीकडे उत्तरेस जारा, बेनून हीं गांवें आहेत. तसेंच नायगर नदीच्या ईशान्य बाजूनें वहाणाऱ्या प्रवाहावर सेगो, सिला आणि टिंबक्टू हीं गांवें असून ती दक्षिणेकडे उतरल्यावर बऱ्याच अंतरावर बुसा नांवाचें गांव आहे. हे सारे स्थलविशेष वाचकांनीं नीट ध्यानांत ठेवावें.

मंगोपार्क हा गँबिया नदीच्या मुखांत आला. नदीचें पात्र भलें रुंद व पाणी गाळानें भरलेलें होतें. दोन्ही तीरावरील झाडांच्या भयंकर मुळ्या पाण्यांत शिरलेल्या होत्या आणि तोंडें वासलेले नद्यश्व म्हणजे हिपोपोटॅमस् हेही मधून मधून दिसत होते. मोठमोठाल्या सुसरी नदीच्या कांठाला ऊन खात बसलेल्या होत्या. असल्या या भयंकर नदींत मंगोपार्कची नाव शिरली.

नाव तीराला लावून त्यानें आपलें सामानसुमान खालीं घेतलें आणि घोड्यावर बसून तो पिसानियापर्यंत पुढें गेला. या ठिकाणीं डॉ. लेडले या मिशनऱ्यानें आपला मठ घातला होता. लेडलेनें या पाहुण्याचें चांगलें स्वागत केलें आणि चार पांच महिने त्याला तेथें राहवून घेतलें. आपण कशाला आलों आहों हें मंगोपार्कनें त्याला सांगितलें, तेव्हां तो त्याला म्हणाला, 'तुम्हीं म्हणतां त्या मुलुखांत सहजासहजीं आणि एकट्या दुकट्याला जातां येण्यासारखें नाहीं. एकाद्या कारवानाबरोबरच तुम्हांला जावयास हवें.' बरेच दिवस वाट पाहिली तरी तिकडे जाणारे कारवान भेटतील असें दिसेना. शेवटीं 'काय वाटेल तें होवो मी एकटाच जाणार' असें त्यानें लेडलेला सांगितलें. त्याचा निश्चय पाहतांच निग्रो जातीचा त्याचा नोकर जॉनसन आणि या नोकराचा मुलगा डेम्बा हे त्याच्याबरोबर जावयास निघाले. गुलामांचा धंदा करणारी कांहीं मंडळीही निघाली. अशा रीतीनें एकट्यानेंच जाण्याचा मंगोवरचा प्रसंग टळला.

गॅंबिया आणि नायगर या नद्यांच्या मधल्या प्रदेशांत अनेक लहान मोठीं राज्यें होतीं. यांना राज्यें हें नांव केवळ अलंकारानेंच द्यावयास हवें. थोड्या थोड्या वस्तीचीं गांवें इतस्ततः पसरलेलीं होतीं. प्रत्येक वस्तीवर अंमल चालवणारा एकादा बलदंड नायक असे. जेवढी जमीन ज्याच्या ताब्यांत तेवढीचा तो राजा. असे अनेक राजे या प्रदेशांत राज्य करीत असत. खावें, प्यावें, मस्ती करावी, मारामाऱ्या कराव्या, एक राजा जाऊन तेथें त्याला मारणारा दुसरा राजा यावा, यापलीकडे या लोकांची संस्कृति गेलेली नव्हती !

समुद्रकांठावर येऊन राहिलेल्या गोऱ्या लोकांची माहिती यांना थोडी थोडी झालेली असे. त्यांच्यापाशीं तंबाखू असते, मणी असतात, कापडाचे तागे असतात; तर ते आपल्याला त्यांच्याकडून मिळावे अशी उत्सुकता

त्यांना असे. कोणी एकादा गोरा माणूस जर त्यांच्या हद्दींतून जाऊं लागला तर कर म्हणून ते या वस्तु त्याच्याकडून वसूल करीत ! मंगोपार्शी असले कर भरावयास फारसें सामानसुमानच नव्हतें. पण होतें तेंच देत देत त्या गुलामांच्या धंदेवाल्यांच्या संगतींत मंगो नायगर नदीच्या खोऱ्याकडे निघाला.

वल्ली नांवाचें पहिलें राज्य लागलें. दुसरें दिवशीं बुग्लि नांवाचें दुसरें राज्य लागलें. तिसरें दिवशीं मलिना नांवाचें एक मोठें शहर लागलें. तेथला जथि नांवाचा राजा म्हणाला, " तुम्ही पुढें जावें हें बरें नव्हे. " गांवांत उतरावें कोठें हेंही कळत नसे. येथून पुढें एक मोठें वैराण लागलें. दोन दिवस पायपिटी केल्यावर ते बन्दो गांवाला पोहोंचले. तेथें रानटी हत्ती चीत्कार करीत फिरत असत आणि गवे फूत्कार करीत प्रवाशी लोकांकडे टवकारून पहात असत. परंतु मंगोही मोठा गमतीदार माणूस होता. तो या गांवच्या लोकांतच जाऊन मिसळला; त्यांच्या कुस्त्यांच्या फडांत जाऊन बसला; त्यांचें डफ तुणतुणें ऐकायला गेला. त्याचा तो सुवर्ण देह पाहून त्या रानटी बायका त्याच्या भोंवतीं गोळा झाल्या आणि त्यांनीं त्याच्या कोटाचीं चकचकींत बटणें कापून घेतलीं.

पुढें नऊ दिवसपर्यंत दऱ्याखोऱ्यांतून जातां जातां तो फत्तेकोंडा या गांवांत येऊन पोहोंचला. तेथें एका गुलाम व्यापाऱ्यानें त्याला उतरावयास जागा दिली. गांवच्या राजानें एका झाडाखालींच त्याचें स्वागत केलें आणि मग राजवाड्यांत भेटीला बोलावलें. अनेक चोरदरवाज्यांतून आंत जातां जातां मधल्या दालनांत राजेसाहेब एका चटईवर बसलेले दिसले. मंगोच्या निळ्या कोटाच्या बटणांकडे राजेसाहेब पुन्हां पुन्हां पाहूं लागले. त्याच्या हातांतील छत्री पाहून तर ते बिलकूल खूष होऊन गेले. शेवटीं राजवाड्यांतून बाहेर पडतांना तो कोट आणि ती

छत्री त्याला तेथेंच ठेवावी लागली. पण मोबदला म्हणून राजेसाहेबांनीं त्याला थोडी सोनमाती दिली; आणि पुढल्या प्रवासाला परवानाही दिला. निरोप देतांना राजाच्या राण्या त्याच्याभोंवतीं जमा झाल्या. त्यांनीं त्याच्या त्या शुभ्र अंगाला हात लावून पाहिला आणि मोठें नवल केलें. त्याचें तें उंच चोंचदार नाक पाहून तर त्या आपल्या ठिकाणीं थिजूनच गेल्या.

**फत्तेकोंड्याहून** निघून तो **कजागा** नांवाच्या पुढल्या गांवाला जाऊन पोहोंचला. आतां 'कर' भरावयास त्याच्यापाशीं फारच थोडें सामान शिल्लक राहिलें होतें. शिवाय त्याच्या बरोबरच्या लोकांना गांवांतल्या चोरट्या प्रजेचा फारच उपद्रव होऊं लागला. म्हणून त्यांचा डोळा चुकवण्यासाठीं ही मंडळी रात्रीचीच हिंडूं लागली. सेराबुली या नांवाचे अगदीं काळेकुळीत निग्रो इकडील रहिवासी होते. खिस्ती लोकांना मारावें येवढाच धर्म त्यांना माहीत झालेला होता. एके दिवशीं मंगोपार्कची बंदूक हिसकावून घेण्यासाठीं राजाचे लोक धांवत आले. कर न.देतां तुम्हीं आमच्या राज्यांत शिरला असा आरोप ठेवून या सर्वांना बांधून घेऊन सेनेगॉल नदीवरील **माना** गांवाला त्यांना नेण्यांत आलें. शेवटीं या मूर्ख लोकांच्या तावडींतून सुटावयाचा मार्ग म्हणजे पळून जाणें येवढाच आहे असें मंगोनें टरविलें. रात्र पडली आणि सगळीकडे सामसूम झाल्यावर मंगोपार्क आणि त्याचे लोक चोरपावलांनीं त्या गांवातून जे बाहेर पडले ते सेनेगॉल नदी ओलांडून जाईपर्यंत थांबलेच नाहींत.

अर्थात् मंगोपार्क हा नायगर नदीच्या रोखानेंच चाललेला होता. पण अजून ती पुष्कळच दूर होती. वाटेंत **कासोन** गांव लागलें. आणि त्याला या रानटी राजांची एकमेकांत झटापट सुरूं होणार आहे अशी वर्दी लागली. परंतु या गर्दीतून हे लोक कसेबसे बाहेर पडले आणि

केम्मू गांवाला आले. तेथें निग्रो लोकांचा त्याच्या भोंवतीं गराडा पडला. लवकरच राजेसाहेबांचें बोलावणें आलें. एका मातीच्या कट्टयावर वाघाचें कातडें टाकून राजेसाहेब बसलेले होते. एका बाजूला त्यांचे हत्यारबंद शिपाई आणि दुसऱ्या बाजूला राण्या आणि राजपुत्र असा थाट होता. त्यांनीं मंगोला सांगितलें कीं, पुढें गेलांत तर लुटारू मूर लोकांचें राज्य आहे आणि याच राज्यांत हूटन नांवाच्या तुमच्यासारख्याच एका प्रवाशाला दगा झालेला होता. इतक्यांत लढाईची गडबड सुरू झाली आणि मंगो लुडामारला निघून गेला. येथें हूटनच्या वधाची जागा त्यांनीं पाहिली.

पुढें जारा गांवाला गेल्यावर नायगर नदीला जाण्याचा परवाना त्यानें तेथल्या राजाजवळ मागितला. परवाना मिळत नाहीं असें पाहून हे लोक रात्रीच्या वेळीं तेथून निसटले आणि पुढल्या राज्यांत गेले. पण तेथील राजाच्या सेवकांनीं त्यांना जबरदस्तीनें राजाकडे नेलें. तेथें त्याला कळलें कीं, ख्रिस्ती माणूस कसा दिसतो हें राजाच्या फतिमा पट्टराणीला बघायाचें होतें म्हणून ही जबरदस्ती झाली आहे! राजेसाहेबांनीं या सर्वांना कैदेंत टाकलें. फतिमा राणीचें दर्शनही लवकरच झालें. एवढी ढमाली बाई मंगोनें पूर्वी कधीं पाहिली नव्हती. त्याच्याकडे पाहिल्यावर राणीला थोडी करुणा आली. इतक्यांत राज्यांत बंडाळी उठली आणि ती संधि साधून मंगो आणि त्याचे लोक येथून निसटले.

आतां मंगो जवळ जवळ खंक बनला होता. गांवच्या लोकांनीं दिलें तर खावें आणि पुढें जावें असें सुरू झालें. येथून पुढें जातां जातां, गुलामांचा धंदा करणाऱ्यांच्या दुसऱ्या एका तांड्यांत तो शिरला आणि थोड्याच दिवसांत तो नायगर नदीच्या कांठावर जाऊन उभा राहिला. आतांपर्यंत त्याचे अतोनात हाल झालेले होते. त्याच्याजवळ छदामही उरलेला नव्हता.

तरी पण नायगर नदी नुसती दिसली असली तरी तिचें थोडेसें तरी संशोधन केल्याशिवाय परत जाणें हें त्याला बरें वाटेना. बांबाराच्या राजानें त्याला खर्चासाठीं ५००० कवड्या दिल्या. नदीच्या कांठानें मंगोपार्क पुढें निघाला. तो सानसान दिंग येथें जाऊन पोहोंचला. जावें तेथें मूर लोकांचा मोठा जाच त्याला सहन करावा लागला. पण अशा स्थितींतही तो तसाच पुढें चालला. वाटेंत एकदां त्यांच्यापुढें एक जिराफ एकाएकीं येऊन उभा राहिला आणि थोडें पुढें जाऊन पाहतों तों आपल्या पुढल्या दोन पायांवर मुस्कट टेकून एक भला दांडगा लालभडक सिंह पसरलेला त्यांना दिसला. मंगो आणि त्याचा वाटाड्या मुद्दामच समोर बघत चालूं लागले. सिंहानेंही कांहीं हालचाल केली नाहीं. अशा प्रकारें, थोडेंसें अंतर पुढें गेल्यावर मंगोला दिसून आलें कीं, पुढें जाण्यांत आतां कांहीं मतलब नाहीं. पावसाळा डोक्यावर आला. तो अंगानें बळकट खरा; पण आतां तो अगदीं थकून गेला होता. कारण महिनोन् महिने त्याला कदान्नावर रहावें लागलें होतें आणि रात्रींच्या वेळीं चावणाऱ्या मच्छरांनीं त्याच्या अंगाची चाळण केली होती. आपण असेच पुढें गेलों तर कोठें तरी नाहींसे होऊं आणि झालेलें संशोधनहि युरोपांत कोणाला कळावयाचें नाहीं असा विचार करून, सिला गांवाहून—म्हणजे टिंबक्टूला तो अजून पोंचला नव्हता तरी—तो परत वळला.

परतीच्या वाटेंतही त्याचे आतोनात हाल झाले. चोरांनीं त्याला कित्येक ठिकाणीं बेदम मारलें. मांडीखालचीं तट्टें ठिकठिकाणीं मरून गेलीं आणि सारा प्रवास त्याला पायीं करावा लागला. कोठें ओंजळभर कोरडें अन्न मिळालें तर तें खावें असा प्रकार सुरू झाला. शेवटीं कामालिया येथें तो कसा तरी धडपडत येऊन पोहोंचला. तेथें कारफा नांवाच्या एका जुन्या ओळखीच्या व्यापाऱ्यानें त्याची चांगली वास्तपुस्त केली; त्याला भरपूर खाऊं पिऊं

घातलें; आणि तो चांगला ताजा तवाना झाल्यावर त्याला मार्गाला लावलें.

मंगोच्या मित्रांची कल्पना झाली होती कीं, हा कोठें तरी मेलेला असावा; कारण या मुलुखांत गेलेला कोणताही युरोपियन माणूस आतापर्यंत परत आलेला नव्हता. शेवटीं त्याचा शोध करावा म्हणून मागें उल्लेखिलेला पाद्री डॉ. लेडले हळूंहळूं त्या बाजूला चालूं लागला, तों १७९७ त जून महिन्याच्या एके दिवशीं त्याला समोरून एक उंच, रोडका, रापलेला युरोपियन माणूस येतांना दिसला. त्याची दाढी वाढलेली होती. त्याला कावीळ झाली होती. लॅड्लेनें ओळखिलें कीं हाच तो आपला मंगोपार्क.

इंग्लंडला परत आल्यावर मंगोपार्कनें विश्रान्ति घेतली आणि आपल्या प्रवासाचें एक मोठें सुरस वर्णन त्यानें लिहून काढलें. एका तरुण स्त्रीची मर्जी त्याच्यावर लवकरच बसली. त्याचें लग्न झालें; आणि लहानपणीं ज्या वैद्यकाचा त्यानें अभ्यास केला होता त्या वैद्यकाचा धंदा त्यानें सुरूं केला.

पण ' पाक-भस्म-रस-गुटिका ' यांत त्याला चैन पडेना. आफ्रिका खंड आणि नायगर नदी हीच त्याच्या डोळ्यांपुढें सारखीं दिसत होतीं. सहा वर्षे गेलीं आणि ब्रिटिश सरकारनें नायगर नदीच्या शोधासाठीं नवी मोहीम काढावयाचें ठरविलें. अर्थातच या मोहिमेचें पुढारीपण मंगोपार्ककडे आलें. या वेळीं मंगो ३४ वर्षांचा झाला होता. या वेळचा त्याचा बरोबरचा सरंजाम चांगला पोक्त होता. त्याचा मेहुणा अंडरसन, इतर कांहीं इंग्रज शिपाई आणि खलाशी, असे सारे मिळून ४३ लोक त्याच्या बरोबर होते.

हे लोक मोठ्या वेगानें निघाले. पावसाळा सुरूं होण्याच्या आंत नायगर नदीपाशीं पोहोंचावें, आणि कांठाकांठानें जितके तिच्या मुखाकडे जाता येईल तितकें जावें, असा त्यांचा हेतु होता.

आतां त्यांच्यापाशीं सामानसुमानाची आणि संरक्षण–साधनांची रेल-चेल होती. मंगोपार्कनें या ४३ माणसांच्या कांहीं टोळ्या केल्या आणि प्रत्येक टोळीला वहातुकीसाठीं कांहीं गाढवें दिलीं. सगळ्यांच्या पुढें स्कॉटच्या टोळीनें चालावें, मार्टिन यानें मधली टोळी घेऊन चालावें, व मंगो आणि अंडरसन यांनीं मागल्या टोळीबरोबर यावें असें ठरलें. टिकाऊ माल त्यांनीं बरोबर पुष्कळच घेतला होता आणि हा विकून बदलांत ठिकठिकाणीं हवें असलेलें सामान आपल्याला मिळवितां येईल असें त्यांना वाटत होतें. रात्रींच्या वेळीं निजावयास त्यांनीं तंबूही बरोबर घेतले होते.

वाटाड्याचें काम इझॅको नांवाच्या एका निग्रोकडे होतें. पण इतक्यांत त्याचें आणि एका गांवच्या लोकांचें कडाक्याचें भांडण झालें. इझॅको म्हणाला, "तुम्हीं माझा तट्टू चोरलेला आहे." त्यांनीं त्याचा तट्टू तर लांबवलाच होता; पण यानें आपल्याला चोर म्हटलें म्हणून त्यांनीं त्याला दाबून मारलें. मंगोनें त्याची कशीबशी सुटका करून घेतली.

पुढें जातात तों मधमाशांचें मोहोळ उठलें आणि त्या चावल्यामुळें यांचीं पांच गाढवें मरून गेलीं. ८ जूनला वादळें उठलीं आणि वाळूचे कण अंगावर सपासप येऊं लागले. सरींवर सरी येऊं लागल्या आणि या मुलु-खांतला भयंकर पावसाळा आतां येऊन ठेपला हें त्याला कळून चुकलें. हा चमत्कारिक पाऊस या गोऱ्या लोकांना सहन होईना. बरोबरच्या सुताराला हगवण लागली आणि तो मेला. दुसऱ्या दिवसापासून सारेच लोक हळूं-हळूं हैराण होऊं लागले. तापानें ते इतके अशक्त झाले कीं, घोड्यावर चढून बसणें हें सुद्धां त्यांच्याच्यानें होईना. तापानें फणफणून ते सडकेच्या कांठीं पडले आणि वातानें बरळूं लागले. अशा या लोकांवर भोंवतालच्या चोरट्यांनीं अचानक हल्ला केला. त्यांची चीजवस्तच त्यांनीं नेली असती तर त्यांना भले म्हटलें असतें! पण चीजवस्त लुबाडून या तुकडींतले निम्मे

लोक त्यांनीं ठार मारून टाकले. उरलेले लोक रखडत पुढें चालूं लागले तों डोंगराळ मुलूख लागला; आणि कळकाच्या मुलखांतून वाट काढणें कठीण होऊं लागलें. त्यांनीं कधीं पाहिलीं नव्हतीं अशीं क्रूर श्वापदें आडवीं येऊं लागलीं. एकीकडे पावसाचा सोसाटा चालू असलेला; आणि दुसरीकडे दर गांवच्या भांडकुदळ लोकांशीं हुज्जत चाललेली—असा हा मंगोचा प्रवास चालू होता. कांहीं काळानें मंगो स्वतः आजारी पडला आणि बरोबरचीं माणसें पटापट मरूं लागल्यामुळें त्याला धसकाच बसला.

एका नदींतून पलीकडे जातांना इझॅकोच्या मांडीला एक सुसर चावली. प्रसंगावधान राखून इझॅकोनें आपलें बोट तिच्या एका डोळयांत खुपसलें. त्याबरोबर ती सुसर थोडीशीं मागें झाली, पण ती पुन्हां चवताळून आली. इझॅकोनें तिच्या दोन्हीं डोळयांत हाताचीं बोटें खुपसलीं. त्याबरोबर ती घाबरी होऊन मागें हटली, पण तिनें इझॅकोच्या पायाचा लचका तोडला.

जुलै महिन्याच्या शेवटपर्यंत सारींच्या सारीं गाढवें मरून पडलीं. मग उरलेल्या माणसांनीं सामानसुमानाचे बोजे आपल्या डोक्यांवर घेतले. असे सात आठ दिवस गेले तों एके ठिकाणीं तीन भले दांडगे सिंह शेजारच्या झाडोऱ्यांतून अचानक उडी मारून त्यांच्यावर आले. मंगोनें बंदूक सरसावली. यत्किंचित्‌ही न डगमगतां तो त्या तिघांच्यावर धावून गेला आणि मधल्या सिंहावर त्यानें गोळी झाडली. त्याचा नेम चुकला. पण झालेल्या बारानें ते सिंह इतके डचकले कीं, ताडकन्‌ उड्या मारून ते पलीकडच्या झाडोऱ्यांत निघून गेले.

आतांपर्यंत स्कॉट हा सगळ्यांच्या पुढें चालला होता. पण आतां तापानें जर्जर झाल्यामुळें तो फार मागें राहिला आणि मंगोपार्क सगळ्यांच्या पुढें चालूं लागला. ऑगस्टच्या १५ तारखेला तो उदार मनाचा व्यापारी



कारफा त्यांना पुन्हां भेटला. त्याच्या घरीं मंगोनें तीन दिवस मुक्काम केला. अशासाठीं कीं, मागें राहिलेल्या स्कॉटनें येऊन पोहोंचावें. तो आला, पण आतां अंडरसन आजारी पडला आणि त्याचें लक्षण बरें दिसेना. आतां मात्र मंगोच्या धैर्याची कसोटी लागण्याची वेळ आली. माणसें बहुतेक सारीं मेलीं होतीं. जवळचें सामानसुमान चट सारं नाहींसें झालें होतें.

हातीं घेतलेलें काम पुरें करण्याची हिंमत मात्र अजूनही त्याच्या त्या जर्जर झालेल्या शरीरांत शिल्लक राहिली होती. आणखी एक दिवसाची वाटचाल झाली आणि दुसरे दिवशीं नायगर नदीचें तें गंभीर पात्र त्याच्या दृष्टीस पडलें !

कशी तरी जमवाजमव करून मंगोनें कॅमू नांवाच्या बोटी विकत घेतल्या आणि त्यांतून तो पुन्हां सेगो गांवाला परत गेला. तेथें मॅनसॉंग यानें त्याला पुढच्या प्रवासाची तरतूद करून दिली. ते सारे उरलेले लोक सन्सन्दिंग येथें पोहोंचले. नायगर नदीचें याच्या पुढचें पात्र मात्र कोणाच्याही ओळखीचें नव्हतें. त्यांनीं एक बळकट कॅमू तयार केली आणि आतां निघणार तों त्याला कळलें कीं वाटेंतच स्कॉट मरून गेला आहे. थोड्याशा दिवसांनीं मंगोचा मेहुणा अंडरसनही मरून गेला. तयार केलेली नांव निरुपयोगी ठरली. म्हणून दोन निरानिराळ्या नावांचे तुकडे एकत्र सांधून त्यांनीं तिला ‘ज्योलिबा’ म्हणजे महानदी असें नाव दिलें. पण ही नांव केवळ ४० फूट लांब असून ६ फूट रुंद होती.

आतां आपल्यापुढें काय वाढून ठेवलें आहे हें मंगोला दिसत होतें. म्हणून झालेल्या कामाचें इतिवृत्त लिहून तें त्यानें इझॅकोच्या हवालीं केलें; आणि त्याला इंग्लंडला पाठवून दिलें. इतिवृत्ताच्या शेवटीं मंगोनें म्हटलें होतें कीं, “उद्यां परवां मी नायगर नदीच्या पात्रांतून पूर्वेच्या रोखानें निघणार आहे. माझें हें ठाम ठरलें आहे कीं, या नदीचें मुख तरी गांठावयाचें किंवा या कामांत मरून तरी जावयाचें. अजून माझ्या संगतींत जे माझे युरोपियन मित्र आहेत, ते जरी सारे मरून गेले आणि मी स्वतः अर्धमेला झालों, तरी मी पाऊल मागें घेणार नाहीं. नायगर नदीचें मुख मी हुडकून काढणारच; आणि तें साधलें नाहीं तर मी मेलों आहें असें समजा.”

मंगोचें हें साहस कोलंबसाच्या साहसापेक्षां सुद्धां अधिक भयंकर होतें' असें अनेकांचें मत आहे. कोलंबसाजवळ परत फिरण्याचें साधन तरी उरलेलें होतें. पण मंगोनें मनांत आणलें असतें तरी त्याला नदींतून उरफाटा प्रवास करतां आला नसता. आतां त्याला पुढें जाणेंच भाग होतें. या वेळीं त्याच्यापाशीं ८ माणसेंच शिल्लक राहिलीं होतीं. नदीच्या पात्रांत ठिकठिकाणीं खडक आपलीं डोकीं वर करून बसले होते आणि नद्यश्वांचे—हिपोपोटॅमसचें—जबडे सर्वत्र दिसत होते. भरींत भर म्हणूनच आसपासचे भामटे मूर लोक त्यांना कांठावरून उपद्रव देत होते.

मंगोचें पुढें काय झालें हें कोणालाच कळेना. एक वर्ष गेलें. दोन वर्षें गेलीं. या संशोधकाच्या संबंधानें कसलीही वार्ता कानीं येईना. इंग्लंडांतील लोक एकमेकांना सांगत कीं, मंगो जिवंत असला पाहिजे. तो हरहुन्नरी माणूस आहे. कोठल्या तरी रानटी राजाच्या दरबारांत तो अजूनही सांपडण्याचा संभव आहे.

१८१० सालीं इझॅको याची रवानगी तिकडे करण्यांत आली. हा इझॅको सेनेगाल नदीवरून निघाला. जातां जातां आमादी फातुमे या एका माणसाची आणि त्याची गांठ पडली. या फातुमेनें मंगोची करुणास्पद हकीकत इझॅकोला सांगितली. तो म्हणाला,

"शेवटीं शेवटीं त्याच्या वाटाड्याचें काम मीच करीत होतों. सन्सन्डिंगहून ज्योलिबा निघाली तेव्हां तिच्यावर मी स्वतः, मंगोपार्क, मार्टिन, तीन शिपाई आणि तीन निग्रो इतकेजण होतों. आसपासचे लोक नावांत बसून आमच्यावर रोज चाल करून येत. पण आम्हीं तसेंच पुढें चाललों होतों. टिंबक्टू शहरावरून आम्हीं पुढें गेलों आणि नायगर नदीला जें एक प्रचंड वळण मिळालें आहे त्यांतून आग्नेयेकडे वळलों. प्रथम प्रथम नदीचें पात्र अतिशय रुंद, शांत आणि गंभीर असें होतें. नारळीचीं बेटें पात्रांतच भेटत असत. होतां

होतां नदी निरुंद होऊं लागली आणि आमची ज्योलिबा नाव शंभर यार्ड रुंदीच्या एका चोळींत येऊन ठेपली. येवढें प्रचंड पाणी येवढ्याशा जागें-तून वाहूं लागल्यामुळें त्याला विलक्षण वेग प्राप्त झालेला होता. यांतूनही आम्हीं पुढें गेलों आणि मग लाल कुरंदी दगडाचे खडपे आम्हांला दिसूं लागले. यांच्यावर मोठमोठाल्या झाडांच्या फांद्या पसरत आलेल्या होत्या. मध्यें मध्यें बेटें लागत आणि त्यांच्या शेजारून जातांना पाण्याला कढ आला आहे असें वाटे.

" असें होतां होतां, टिंबक्टूपासून १००० मैल आम्हीं खालीं गेलों आणि शेवटीं बुसा नांवाची एक प्रचंड खडप्यांची खिंड आम्हांला लागली. आमची नाव येथें आली. आम्हीं तेथें थोडें थांबलों आणि मी स्वतः शेजारच्या गांवांतून कांहीं खायला विकत घ्यावें म्हणून तिकडे गेलों. तों त्या लोकांनीं मला धरून ठेवलें आणि प्रत्यक्ष तुरुंगांतच घातलें. माझी वाट पाहून पाहून मंगोनें आपली नाव त्या पाणखिंडींतून पुढें चालवली. इतक्यांत शेजारच्या कांहीं बदमाशांनीं ज्योलिबा नावेवर हल्ला केला. तिनें पुष्कळ वेळ लढत दिली. शेवटीं ती फुटली आणि मंगोसकट सारीं माणसें नायगरच्या पाण्यांत बुडून मेलीं."

मंगोच्या मृत्यूची ही हकीकत कांहीं निराळ्या रूपानें इतरांनीं दिली आहे. पण तात्पर्यार्थानें इझ्झकोचें निवेदन प्रमाण म्हणून मानावयास कांहींच हरकत नाहीं.

---

## बर्क व विल्स

## पूर्व ऑस्ट्रेलियाचा शोध

या प्रकरणांत ऑस्ट्रेलियाच्या पूर्व भागांत झालेल्या संशोधनाची हकीकत सांगावयाची आहे. वाचकांनीं सोबत जोडलेला छोटा नकाशा नीट पाहून ठेवावा.

इ. स. १८४४ त स्टर्ट आणि स्टुअर्ट या दोन प्रवाशांनीं अडेलेडच्या उत्तरेकडे प्रवास करून पुष्कळच प्रदेशाची पाहणी केली. ती करतांना त्यांना उन्हाचा ताप इतका झाला कीं, त्यांच्या डोक्यावरचे केस आणि बोटावरचीं नखें वाढेनाशीं झालीं. मेंढरांच्या अंगावरची लोंकरही वाढेना आणि लांकडाच्या पळया, काटवटी इत्यादि भेगाळून गेल्या. थंडी पडली म्हणजे पुन्हां ती दुसऱ्या टोंकाला जाई. तथापि या दोघां प्रवाशांनीं संशोघनाचें फार महत्त्वाचें काम केलें.

यानंतर ईरी नांवाच्या प्रवाशानें ऑस्ट्रेलियाच्या येट पश्चिमेच्या कांठावर जाऊन पोहोंचावयाचा चंग बांधला, पण वाटेंत त्याला खायला मिळेनासें झालें. त्याच्या युरोपियन मित्राला तेथील रानटी लोकांनीं मारून टाकलें; आणि ६०० मैलांची वाटचाल करून हा स्वतःच परत कसा आला, याचेंच सर्वांना नवल वाटलें.

इ. स. १८४८ त लड् विग् लीशहार्ट या वनस्पति-शास्त्रज्ञानें हीच धमक धरली आणि **क्वीन्सलँडमधून** उत्तर ऑस्ट्रेलियाकडे तो निघाला. याच्याबरोबर दुसरे सातजण गेलेले होते आणि जवळ वहातुकीचीं साधनेंही बरीं होतीं. परंतु ही सर्व मंडळी त्या वैराण मुलुखांत कोठें बेपत्ता झालीं हें अजूनही कोणाला कळलेलें नाहीं. यांच्या मागून ऑगस्टस ग्रेगरी हा उत्तर ऑस्ट्रेलियांत पूर्व किनाऱ्यापासून पश्चिम किनाऱ्यापर्यंत गेला आणि तेथून परत तो पूर्व किनाऱ्यावर आला. लीशहार्ट याला शोधून काढावें म्हणून त्यानें पुष्कळ पायपिटी केली. पण शेवटीं प्यायला पाणी मिळेना म्हणून कोठल्या तरी वाटेनें तो अडेलेड येथें येऊन पोहोंचला.

दक्षिणेकडून थेट उत्तरेकडे जाण्याचा यत्न १८५८ सालीं एम् डू अल स्टुअर्ट यानें केला. त्यानें हरतऱ्हेच्या आपत्ति सोसल्या आणि या कामीं यश मिळवल्यासारखेंच केलें. पण तें प्रत्यक्ष पदरांत पडण्याच्या आधींच त्याला परत फिरावें लागलें. शेवटीं ज्या बर्क व विल्स या लोकांनीं या कामांत पूर्ण यश मिळवलें, त्यांची हकीकत आतां द्यावयाची आहे.

दक्षिण समुद्राच्या कांठीं असलेल्या **अडेलेड** बंदराच्या सरळ उत्तरेला **कूपर्स क्रीक** या नांवाचें एक ठिकाण आहे येथील नदीला नेहमींच खांडवे पडलेले असत. येथून उत्तरेकडे निघावयाचें आणि सरळ पुढें जातां जातां **कार्पेंटारिया** या आखाताला जाऊन पोहोंचावयाचें व तेथून **व्हिक्टोरिया** शहराला परत यावयाचें, असें या नव्या प्रवाशांचें ठरलेलें होतें.

या भ्रमन्तीचा पुढारी रॉबर्ट बर्क नांवाचा एक नकाशे तयार करणारा माणूस होता. ग्रे आणि किंग असे सामानासुमानाची बांधाबांध करणारे दोन लोक त्यानें बरोबर घेतले होते. वहातुकीसाठीं उंट घेतलेले होते आणि एखाद्या वेळीं उंट दमले तर किंवा मारून टाकावे लागले तर कांहीं तट्टेंई,

बरोबर घेतलीं होतीं. मदतनीस म्हणून ब्राहे याच्या हाताखालीं कांहींजण देऊन त्यांना बर्कनें कूपर्स क्रीक येथें ठेवावयाचें ठरविलें होतें. १८६० ऑक्टोबर १९ ला डार्लिंग नदीच्या कांठीं असलेल्या मेनेन्डी गांवाहून ही मंडळी उत्तरेच्या रोखानें निघाली.

पहिल्यापहिल्यानें त्यांना छान हिरवळीचीं मैदानें लागलीं; आणि मधून मधून पाण्याचे झरेही भेटले. नोव्हेंबर ११ ला ते कूपर्स क्रीक येथें गेले. तेथें त्यांनीं ५ डिसेंबरपर्यंत तळ ठोकला. येथले मूळचे रहिवासी अगदीं काळे, नागडे, भय वाटेसे कुरूप असे होते. शिवाय ते चोरटे होते हें निराळेंच. पण यांच्या तळाला खरा उपद्रव झाला तो उंदरांचा आणि घुशींचा झाला ! त्या प्रत्येक गोष्ट खाऊं लागल्या ! शेवटीं तेथें राहणें नकोसें होऊन या लोकांनीं आपला तळ तेथून हलवला. तो हलविण्यापूर्वी बर्कनें उत्तरेची वाट पुढें कोठें दिसते का हें टेहेळण्यासाठीं कांहीं लोकांना पुढें पाठविलें. विल्स हा या कामासाठीं ९० मैल पुढें गेला. पण त्याला कोठें पाण्याचा टिपूसही दिसला नाहीं. त्याचे उंट पळून गेले. शेवटीं तो आणि त्याचा एक मदतनीस असे पायीं परत आले.

बर्क आणि विल्स हे वायव्येच्या रोखानें निघाले आणि ब्राहे याला त्यांनीं तेथल्याच एका टापूवर नवा तळ ठोकून कायमचें ठेवून दिलें. हे पुढें जातात तों वाटेंत दलदली लागूं लागल्या. नवें वर्ष उगवलें आणि त्यांना मोठा डोंगराळ प्रदेश लागला. या गोऱ्या लोकांना पाहून तद्देशीय लोक एकदमच बिचकले. एका म्हाताऱ्या माणसानें आपला भाला भुईत रोवला आणि मूठभर माती घेऊन ती त्यानें यांच्याकडे फेकली. याचा अर्थ असा कीं, या म्हाताऱ्याच्या मनात ‘ चले जाव ’ म्हणावयाचें होतें. त्याला चमकवण्यासाठीं बर्कनें पिस्तुलाचा एक बार काढला. त्याबरोबर तो म्हातारा माणूस पळत सुटला.


कारपेंटरीयाचे
आखात
११ फेब्रु.१८६१
फ्लिंडरस
पर्वतांची ओळ
एरीचें सरोवर
कूपरचा साठा
बॉरिसबेन
होपलेस पर्वत
टोरेन्स
सरोवर
डार्लिंग
मेनिनडाय
सिडने
अॅडेलीडे
मेलबोर्न
बास समुद्रधुनी
बर्क आणि विल्स
यांचे मार्ग

मकरवृत्त ओलांडून हे लोक सरळ पुढें गेले आणि एका वाळवंटांत शिरले. मधून मधून कोठें कोठें पाणी सांपडत असे. डोंगराळ प्रदेशांतून जातांना उंट भारीच घाबरे होत आणि कुंथूं लागत. जातां जातां ते कार्पेन्टारिया आखाताच्या नजिक येऊन पोहोंचले. फ्लिंडर्स या नांवाच्या एका नदीच्या खोऱ्यांत ते उतरले. पण या नदीच्या दरडींत उंटांचे पाय भसाभस जाऊं लागले. एक उंट तर इतका खालीं गेला कीं, शेवटीं, त्याच्यावरचें सामान काढून घ्यावें लागलें आणि कांहीं केल्या तो जागचा निघेना म्हणून त्यांनीं त्याला तेथेंच सोडून दिलें. मग जवळपास, एक टणक जागा पाहून दोघेजण त्या तळावर राहिले आणि एका तट्टावर आवश्यक तें सामान लादून घेऊन बर्क आणि विल्स हे पायींच समुद्रकांठाकडे गेले. पण हें तट्टू असेंच कोठेंसें चिखलांत रुतलें. पुन्हां बाहेर यावें, पुन्हां रुतावें, असें कितीदां तरी झालें. या प्रवाशांचे पायही कमरेइतके चिखलानें लडबडून जात. असें करतां करतां शेवटीं ते एकदाचे समुद्र-कांठीं जाऊन पोहोंचले. ऑस्ट्रेलियाचें उत्तर टोंक त्यांनीं गांठलें.

आतां ही सर्व मंडळी पुन्हां दक्षिणेकडे परत जावयास निघाली. फेब्रुआरीच्या १५ तारखेला ही परतीची भ्रमन्ति चालूं झाली. त्यांच्यापाशीं त्या वेळीं ८२ शेर कणिक, १॥ शेर डुकराचें मांस, १८ शेर सुकें मांस, ६ शेर बिस्किटें, ६ शेर तांदूळ व ५ शेर साखर येवढेंच काय तें होतें व त्याच्यावर चार माणसांचा ९०० मैलांचा प्रवास व्हावयाचा होता. आतां-पर्यंत उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें तिकडल्या भुसभुशीत जमिनीवरून सुद्धां त्यांचा प्रवास साधारण बरा झाला.

पण आतां पावसाळा सुरू झाला आणि प्रचंड वादळें उठलीं. पावसानें जिकडे तिकडे चिखल माजला आणि उंटांचे पाय त्यांत रुतूं लागले. पुढें पाऊल टाकण्याची सोय नाहीं असें झालें. जवळचें अन्न

निःसत्व होत चाललें होतें आणि तेंही तोटकें असे. शिकार करावी तर सगळ्या रानांत कोठें कांहींसुद्धां दिसेना. एकदां एक मोठा काळा भुजंग मात्र त्यांनीं मारला आणि खाल्ला. कांहीं वेळपर्यंत बर्क आणि ग्रे या दोघांना घेरी आल्यासारखें झालें.

मार्चच्या ११ तारखेला त्यांना वाटूं लागलें कीं, आतां जरा बरे दिवस येतील; पण एकदोन दिवसांतच पावसाचा धुमधडाका सुरू झाला आणि जीव बचावण्यासाठीं ही मंडळी एका डोंगर-कपारीच्या आश्रयाला गेलीं. अन्नाच्या तुटवड्यामुळें या प्रवाशांच्या शक्ति क्षीण होऊं लागल्या होत्या आणि त्यांतच या चिकट आणि दलदलीच्या प्रदेशांतून वाटचाल करावयाची असल्यामुळें ते अगदीं रकमेला आले. ओझें कमी व्हावें म्हणून, तीस शेर अन्न त्यांनीं वाटेंतच टाकून दिलें. २१ तारखेला तर पावसाच्या माऱ्यामुळें, त्यांना एक पाऊल उचलतां येईना. असें ठरलें होतें कीं, तीन महिन्याच्या अवधींत त्यांनीं ब्राहे राहिला होता त्या तळावर परत यावयाचें. हे तीन महिने केव्हांच संपून गेले होते आणि अजून ५०० मैलांची वाटचाल शिल्लक राहिली होती. जवळचें अन्न घटत चाललें होतें. त्यांतच ग्रे याला चोरून खाण्याची बुद्धी झाली. त्यामुळें उरलेल्यांना अन्न कमी पडूं लागलें. रागारागानें त्या तिघांनीं ग्रे याला चाबकाखालीं झोडपून काढलें.

हवामान थोडें बदललें आणि वादळें उठत होतीं, तरी त्यांना थोडी वाटचाल करतां येऊं लागली. अन्न हवें म्हणून त्यांनीं एक उंट मारला आणि पुढें दहा बारा दिवसांनीं तें तट्टूही त्यांनीं मारून खाल्लें. ग्रे यानें चोरून खाल्लें होतें हें खरें; पण तेवढ्यानेंही त्याचें भागलें नाहीं ! तो हळुहळू क्षीण होऊं लागला. एप्रिल १७ ला अंगावरून वारें गेल्यासारखें होऊन तो धाडकन् खालीं पडला आणि मरून गेला. शेवटीं ११ तारखेला ते

ब्राहेच्या तळावर येऊन पोहोंचले. पण तेथें पाहतात तों सारा शुकशुकाट दिसला ! त्या दिवशींच सकाळीं या लोकांची वाट पाहून कंटाळून जाऊन, तळ हलवून, ब्राहे दक्षिणेकडे निघून गेला होता. पण जातांना, त्यानें त्या तळावर २५ शेर कणिक, २५ शेर ओट धान्याचें पीठ, १५ शेर साखर आणि १८ शेर तांदूळ इतकें सामान एका मोठ्या झाडाच्या बुंध्याजवळ पुरून ठेवलें होतें आणि झाडाच्या सालींत 'खणून पहा' अशीं अक्षरें कोरलीं होतीं.

तळावर कोणीच नाहीं हें पाहून या श्रमलेल्या लोकांची अत्यन्त निराशा झाली. पण त्याला ब्राहेचा तरी काय इलाज होता ? ठरलें होतें त्याप्रमाणें पाहतां महिनाभर याच्या आधींच तो येथून गेला असता तरी चाललें असतें. पण बर्क आणि त्याचे मित्र आज येतील उद्यां येतील या आशेनें तो तेथें महिनाभर बसून राहिला होता. शेवटीं यांचें कांहीं बरें-वाईट झालें असें समजून वरिष्ठांच्या आज्ञेप्रमाणें तो व्हिक्टोरियाकडे जावयास निघाला. त्यांच्यापाशीं सहा उंट आणि बारा घोडे होते. त्यांना नित्य वैरण कोठून आणावी हा एक त्याच्यापुढें प्रश्नच होता. शिवाय घुशींचा उपद्रवही इतका होऊं लागला कीं, धान्याच्या गोण्या झाडाला लोंबत लावणें त्याला प्राप्त झालें ! रोज चाळीस घुशी मारल्या, तरी त्या आवरेनात. मार्च महिना संपत आला आणि पाऊस पडूं लागेल असें त्याला वाटूं लागलें. तत्रस्थ लोकांनीं त्याला सांगितलें कीं, पाऊस पडला कीं नदीचें खोरें जलमय होऊन जाईल; आणि तुमचा सारा तळ पाण्या-बरोबर वाहून जाईल. त्याच्या जवळच्या माणसांत स्कर्व्हीचा रोग सुरू झाला; आणि त्यालाही कणकण येऊं लागली. बर्क आणि त्याचे मित्र उत्तरेच्या बाजूनें येतात कां पहावें म्हणून हे दूरवर जाऊन टेहेळणी करून आले; परंतु, त्यांचा मागमूसही दिसेना. शेवटीं वर सांगितल्याप्रमाणें

धान्य पुरून ठेवून आहे तळ उपटून दक्षिणेकडे निघाला. तो सकाळीं निघाला आणि दुपारच्या वेळीं हे थकलेले प्रवासी तेथें येऊन पोहोचले.

बर्क, विल्स आणि किंग हे तिघे कसे तरी कोलमडत तळांवर येऊन पोहोंचले. त्यांच्यापाशीं आतां सुमारें अच्छेर सुकें मांस शिल्लक राहिलें होतें. आतां ब्राहेच्या मागावर जावें काय असें त्यानें मित्रांना विचारलें. तेव्हां ते म्हणाले, "मुळींच नको." पुरलेलें अन्न त्यांनीं उकरून काढलें आणि त्यांच्या हातांपायांत जरा जोर आला. अजून त्यांच्यापाशीं दोन उंट होते; आतां अडेलेडकडे जावें म्हणून ते एका आडवाटेनें निघाले. पण दिवसाच्या काठीं पांच मैलांपेक्षां जास्त प्रवास त्यांच्यानें होईना. वाटेंत कांहीं रानटी लोक भेटले. त्यांना काड्याची पेटी आणि इतर कांहीं चिजा दिल्यावर त्यांनीं थोडी मासोळी आणून दिली. पुढें जातां जातां २८ एप्रिलला त्यांतला एक उंट चिखलांत रुतला. तो बाहेर निघेना. शेवटीं त्यांनीं तो कापून टाकला आणि त्याचें मांस वाळवून बरोबर घेतलें. आतां राजा नांवाचा एकच उंट राहिला होता. त्याच्यावर त्यांनीं बहुतेक सामान लादलें. आणि हातांत लहान सहान बोचकीं घेऊन, हे तिघेजण पुढें निघाले. थोड्याच वेळानें राजाही खंगल्यामुळें खालीं बसला आणि त्याच्या पाठीवरचें सामान तेथेंच काढून टाकावें लागलें. सामान काढल्यावर राजा उठून उभा राहिला; पण पाणी कोठें दिसेना. शेवटीं कूपर्सक्रीक्‌कडे—उत्तरेकडे हे सारे परत वळले. राजा लटपटूं लागलेला, अन्न संपत चाललेलें आणि कपड्यांच्या चिंध्या झालेल्या. अशा स्थितींत हे कसेबसे चालत राहिले. इतक्यांत राजा भुईवर कोसळला. शेवटीं त्यांनीं त्याला गोळी घातली आणि त्याचें कांहीं मांस बरोबर घेतलें. आतां मात्र त्यांना कसलाही आश्रय उरला नाहीं. थोडेसे रानटी लोक भेटले. त्यांना यांची फार दया आली; आणि त्यांनीं यांना दोन चांगल्या पोसलेल्या घुशी दिल्या. जातां जातां शेवटीं

२० तारखेला विल्स सगळ्यांच्या पुढें गेला आणि ब्राहेच्या त्या शून्य तळावर जाऊन पोहोंचला. तत्रस्थ लोक सांगूं लागले कीं, 'तुम्हीं येथें राहूं नका.' शेवटीं या तिघांना कांहीं बी सांपडलें. तें त्यांनीं कुटलें आणि तेवढ्या-वर कांहीं दिवस कसाबसा गुजारा केला. आतां त्यांना कळून चुकलें कीं, आपला निभाव फार झालें तर पंधरा दिवस लागेल. डायरी लिहिण्याचें काम मात्र त्यांनीं चालू ठेवलें.

आतां थंडी पडूं लागली आणि अंगावरच्या चिंध्यांनीं तिचें निवारण होईना. जवळ एक हलकासा तंबू उरला होता. त्यालाही एके दिवशीं आग लागली. काय करावें हें त्यांच्या ध्यानांत येईना. शेवटीं विल्स हा जागेवर राहिला आणि 'कोठें तरी येथल्या रहिवाशांना गांठा आणि कांहीं मिळालें तर खा' असें त्यानें त्या दोघांना सांगितलें. त्याला सोडून जाणें बर्क आणि किंग यांच्या जिवावर आलें. पण विल्स निक्षून बोलला, "माझें काय होईल तें होवो. माझें हें घड्याळ आणि मी देतों हें पत्र तुम्हीं माझ्या बापाला द्या." बर्क आणि किंग हे आश्रया-साठीं पुढें निघाले. बर्कचे पाय लटपटूं लागले. दुसरे दिवशीं ते दोन मैल गेले आणि बर्क एकाएकीं खालीं पडला. किंगनें खाकेंत हात घालून तो उठतो कां पाहिलें, पण त्याला ग्लानी आली. इतक्यांत एक कावळा दिसला. तो त्यानें मारला आणि काटक्याकुटक्यांवर भाजून त्यांनीं तो खाल्ला. जेवण झाल्यावर बर्क म्हणाला, "माझ्या मित्रा, मी आतां चार घटकांचाच सोबती आहे. मी मरूं लागलों म्हणजे एवढें कर. तूं माझें पिस्तूल उजव्या हातांत ठेव आणि मेल्यावर माझ्या अंगावर माती बिती लोटूं नको. मी असेन तसाच मला ठेव." दुसरें दिवशीं सकाळीं बर्कची दांतखीळ बसली आणि आठ वाजतां त्यानें प्राण सोडला.

आतां किंग एकटाच उरला! काय करावें आणि कोठें जावें हें त्याला कळेना. इकडे तिकडे भटकतां भटकतां तेथल्या रानटी लोकांचा एक धान्याचा सांठा त्याला सांपडला आणि एक मेलेला कावळा त्याला सापडला. थोडा ताजातवाना झाल्यावर त्याला वाटलें कीं विल्सकडे परत जावें. वाटेनें त्यानें तीन कावळे मारले, पण विल्सकडे जाऊन पाहतो तों तो बापडा मरून पडलेला होता. त्यानें विल्सचें दफन केलें. आतां मात्र किंग हा अगदीं पोरका झाला.

शेवटीं त्या रानटी लोकांना हुडकून काढावयाचें आणि त्यांच्या संगतींत दिवस कंठायचे असें त्यानें ठरविले. हिंडता हिंडता हे लोक त्याला भेटले. त्यांनीं त्याला खाऊं घातलें. दिवसाच्या कांठीं एकादा मासा, एकादें पाखरूं ते त्याला देत. त्यांनीं त्याला कसें बसें जगवून धरलें. किंगला वाटत होतें कीं, केव्हांना केव्हां आपल्या शोधासाठीं कोणी तरी येईल. सप्टेंबर १५ ला ही त्याची आशा सफळ झाली.

होविट हा आपल्या कांहीं मित्रांना बरोबर घेऊन या प्रवाशांच्या शोधार्थ निघाला होता. तो तेथें येऊन पोहोंचला. त्याला पाहतांच किंगला अतिशय हर्ष झाला. होविटपाशीं पुष्कळ अन्न होतें. खाऊन पिऊन तो चांगला ताजातवाना झाला आणि होविटबरोबर अडेलेडकडे परत आला. एकजण सोडून बाकीचे सारे प्रवासी मरून गेले होते. पण ऑस्ट्रेलियाच्या दक्षिण किनाऱ्यापासून तो उत्तरेकडील कार्पेंटारिया आखातापर्यंतचा हजारों मैलांचा सारा प्रदेश या प्रवाशांच्या डोळ्यांखालून गेला होता; आणि त्याचें सुरस वर्णनही त्यांनीं आपल्या डायरींत केलें होतें.

---

# उत्तर-ध्रुवाचें संशोधन

१६६५ मध्यें डच व्यापाऱ्यांनीं कोला येथें एक वसाहत स्थापन केली. पुढें १२ वर्षांनीं त्यांच्या खलाशांना द्विना नदीच्या मुखांत आपलीं जहाजें नांगरतां आलीं. कोला हें एक लहानसें द्वीपकल्प फिनलंडच्या उत्तरेला असून त्याच्या दक्षिणेला व पूर्वेला श्वेत समुद्र आहे. द्विना नदी ही युरोपांतील मध्य रशियांतून उगम पावून श्वेत समुद्रांतील एका आखातास जाऊन मिळते. इतक्या वर्षांपूर्वी डच जहाजें या नदीच्या आर्केंजल मुखापर्यंत गेलीं हेंही विशेषच आहे. नॉर्वे, स्वीडन आणि फिनलंड यांच्या सर्व किनाऱ्यांना वळसा घालून दक्षिणेकडे उतरणें हें तेव्हांच्या दिवसांत सुद्धां मोठें अवघडच काम होतें. द्विना नदीच्या मुखाजवळ या डच व्यापाऱ्यांनीं आपली एक वसाहत स्थापन केली आणि या ठिकाणींच पुढें आर्केंजल नांवाचें शहर व बंदर प्रस्थापित झालें. हा सर्व उद्योग ऑलिव्हर ब्रूनेल या नावाड्यानें केला; आणि म्हणून श्वेत समुद्रांत डच व्यापाराचा प्रवेश करून देणारा पहिला खलाशी म्हणून त्याला इतिहासांत मोठा मान आहे. येथून तो पुढें पायवाटेनें पण समुद्राच्या कांठाकांठानें सायबेरियाच्या किनाऱ्यापर्यंत गेला आणि आशिया खंडांत शिरून ओब नदीच्या तीरापर्यंत आला. आशिया व युरोप यांच्यामध्यें जो उरल पर्वत आहे

त्याच्या पूर्वेच्या बाजूस ही **ओब** नदी वहात असून ती उत्तरेकडील समुद्राला **ओब** आखातापाशीं मिळते. प्रवास करतां करतां, **नोव्हाझेम्ला** बेटांतील **कोस्टीनशार** या ठिकाणालाही तो जाऊन आला. या प्रदेशांत हिंडत असतांनाच, इकडच्या बाजूनें चीन देशाला जातां येईल अशी कल्पना त्यानें बांधली आणि १५८२ मध्यें आपलें जहाज त्यानें **आर्क्तिक्** समुद्रांत हांकारलें. ऑलिव्हर ब्रूनेल याला या कामांत यश मिळालें नाहीं. त्यानें या समुद्रांत जाण्याचें धाडस केलें हें खरें, परंतु **युगर** सामुद्रधुनींतून **कारा** समुद्रांत उतरण्याचा त्याचा प्रयत्न चालूं असतां **पेचोरा उपसागरांत** त्याचें जहाज कोठें तरी आपटून फुटलें. पण ब्रूनेल याला अपयश आलें तरी आर्क्तिक् समुद्रांतील संशोधनाची वाट स्वकीयांना दाखवून देणारा हा पहिला डच खलाशी होय.

उत्तरेच्या बाजूनें चीन व हिंदुस्थान इकडे एकादी वाट शोधून काढणें आतां हॉलंडला अगत्याचें झालें होतें; कारण युरोपच्या दक्षिणेकडील वाटांचा मक्ता स्पेन व पोर्तुगाल येथील लोकांनीं आपल्या हातीं ठेवला होता. ब्रूनेलच्या प्रयत्नामुळें उत्तरेकडून वाट काढतां येणें शक्य आहे, असें डच व्यापाऱ्यांना दिसूं लागलें. १५८४ नंतर या राष्ट्राचा दक्षिणेकडील व्यापार अगदींच बंद पडला. दहा वर्षांची कुचंबणा संपल्यानंतर १५९४ त **ॲमस्टरडॅम्** येथील पीटर क्लेनूसअस या भूगोलवेत्त्यानें उत्तरेकडील **समुद्रांत** चार जहाजें पाठवलीं. यांपैकीं दोन विल्यम बारेंट्स याच्या हातीं होतीं. पूर्वेकडे जातां जातां जुलै ४ च्या सुमाराला तो **नोव्हाझेम्ला** बेटाला लागला आणि एक महिनाभर तिकडच्या बाजूला फिरून त्यानें त्या बेटाचा सर्व पश्चिम किनारा शोधून पाहिला. पुढें **ऑरेन्ज** बेटाचा शोध लावून तो परत फिरला. उरलेलीं दोन जहाजें **कॉर्नेलियस ने** याच्या हाताखालीं होतीं. त्यानें **युगर** सामुद्रधुनीचा शोध लावला

आणि तिच्यांतून तीं जहाजें कारा समुद्रांत शिरलीं. तेथून पुढें याल्मल द्वीपकल्पाच्या पश्चिम किनाऱ्यावर हीं जहाजें गेलीं. तेथें कॉर्नेलियस ने याला वाटलें कीं हाच चीन आणि जपान यांचा मार्ग असावा. इतका शोध करून तो परत फिरला. उत्तर-यूरोप व ध्रुवप्रदेश यांचा नकाशा वाचकांनीं नीट पहावा.

१५९५ त बॅरेन्टस् आणि ने या दोघांनीं सात जहाजें बरोबर घेतलीं आणि युगर सामुद्रधुनींतून कारा समुद्रांत शिरण्याचें साहस करून पाहिलें. पण पुन्हां पुन्हां प्रयत्न करूनही प्रतिकूल परिस्थितीमुळें त्यांना या कामांत यश मिळालें नाहीं. १५९६ त हिमशर्क आणि रिप् यांच्या हाताखालीं दोन जहाजें याच कामासाठीं निघालीं. बॉरेंट्स याची संशोधनाची ईर्षा अजून लोपलेली नव्हती. म्हणून हिमशर्क याच्या हाताखालीं टेहेळ्याचें काम पत्करून तो याही पर्यटणांत गेला होता. उत्तरेच्या रोखानें जातां जातां जून महिन्यांत बिअर बेटावर ते येऊन पोहोंचले. त्याच वाटेनें पुढें जातां जातां ८० अक्षांशांच्या सुमारास बर्फानें अच्छादलेली एक डोंगराळ भूमि त्यांना दिसली. तेथून पुढें मात्र त्यांना बिलकूल जातां येईना. कारण बर्फाचा मोठाच खच तेथें पडला होता. या बेटाला त्यांनीं स्पिटस्बर्जन असें नांव दिलें. परत फिरून ते जुलै १ ला बेअर बेटांवर आले. तेथून रिप् हा परत फिरला व हिमशर्क आणि बॅरेन्टस् हे दोघे नोव्हाझेम्लाचें उत्तर टोक वळसून पूर्वेच्या दिशेनें जावें म्हणून त्या मार्गानें निघाले. ऑगस्ट २६ ला आईस हॅवन येथें ते पोहोंचले. हवामान बदललें. हिंवाळा येऊन ठेपला. परत फिरणें अशक्य झालें, म्हणून समुद्रावर वहात येणारीं लांकडें त्यांनीं धरलीं आणि कांठावर त्याचें घर-कुल बांधलें. सबंध हिंवाळा येथें घालवून वसंतऋतु आल्याबरोबर त्यांनीं पुन्हां आपल्या नावा बाहेर काढल्या आणि ते लॅपलॅण्डच्या किनाऱ्याकडे

निघाले. पण जहाजें तेथें पोहोंचावयाच्या आधींच बॅरेंटस् हा मरण पावला. उत्तर-ध्रुव प्रदेशांत सबंध हिवाळाभर दिवस कंठणारे हे पहिलेच संशोधक होत.

* * *

नॉर्वे व रशिया यांच्या उत्तरेकडून पूर्वेकडे जातां जातां जवळच कोठें तरी दक्षिणेकडे वळल्यास पॅसिफिक् महासागरांत शिरतां येईल आणि त्यांतून चीन व हिंदुस्थान इकडचा मार्ग सांपडेल, असा एक अंदाज होता; आणि दुसरा असा होता कीं, उत्तर अमेरिकेच्या उत्तरेकडून पश्चिमेकडे जातां जातां अमेरिका खंड कोठें तरी संपेलच आणि त्याला वळसा घालून दक्षिणेकडे उतरलें म्हणजे पॅसिफिकमध्यें शिरतां येईल व त्यांतून चीन व हिंदुस्थान यांची वाट सांपडेल. या दोन्ही वाटा शोधून काढण्याच्या प्रयत्नाच्या बुडाशीं प्रथमतः व्यापारी हेतु होता. हळुहळू याच्या जोडीला मच्छिमारीचा हेतु येऊन चिटकला. कारण मच्छिमारीची संवय झालेले खलाशी एरवींच्या खलाशांपेक्षां अधिक धाडसी असल्यामुळें आणि समुद्राची माहितीही त्यांना जास्त चांगली असल्यामुळें, व्यापारी लोकांनीं त्यांनाच हाताशीं धरलें. पण त्यानीं या व्यापाराला मच्छिमारीचें रूप दिलें. हळुहळू हे दोन्ही हेतु मागें पडून शुद्ध संशोधनाचा हेतूच प्रबल होत गेला आणि भौतिक शास्त्राची चांगली माहिती असलेले पंडित या कामांत येऊन दाखल झाले. पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे न जातां आइसलंड, ग्रीनलंड, नोव्हाझेम्ला, स्पीटस्बर्जन् इत्यादि बेटांवरून थेट उत्तर-ध्रुवाकडे जावें; ध्रुव प्रदेशाचें संशोधन करावें आणि जमल्यास ध्रुव बिंदूवर पोहोंचून तेथें संशोधनाचें निशाण रोवावें, ही उमेद या लोकांच्या मनांत बळावूं लागली. प्रवासाला जों जों संशोधनाचें रूप येऊं लागलें, तों तों व्यापारी लोकांचे हेतू मंदाऊं लागले आणि समुद्र-भ्रमन्तीच्या

कामांत मदत करावयास युरोप व अमेरिका यांतील उत्तरेकडील राष्ट्रें मोठ्या ईर्षेनें पुढें येऊं लागली. नॉर्वे, स्वीडन, रशिया, डेन्मार्क, जर्मनी, हॉलंड, इंग्लंड, अमेरिका या देशांत एक तऱ्हेची स्पर्धाच उत्पन्न झाली आणि उत्तर ध्रुवाचा शोध कोण आधीं लावतो हाच विषय या देशांच्या दरबारांत खेळूं लागला. प्रत्येक राष्ट्रानें निरनिराळे यत्न करून पाहिले. शेवटीं असें दिसूं लागलें कीं, सर्वांनीं मिळून या कामांत पडावें. एकेकट्याचें हें काम नव्हें. उत्तरध्रुव-समुद्राचें यथायोग्य निरीक्षण केल्याशिवाय ध्रुवाच्या रोखानें धूम ठोकणें धोक्याचें आहे असें सर्वांनाच दिसूं लागलें. परंतु हें सर्वच्या सर्व निरीक्षण एका राष्ट्राच्या हातून होणार नाहीं, हेंही सर्वांच्या ध्यानीं आलें. हळुहळूं सहकार्याची कल्पना बळावत चालली आणि ज्या त्या राष्ट्रानें आपली स्वतंत्र मोहीम ध्रुव-प्रदेशाकडे काढावी आणि केलेल्या निरीक्षणाची तपशीलवार नोंद करावी असें ठरलें. या सर्व नोंदी एकत्र केल्या म्हणजे ध्रुव प्रदेशाचें ज्ञान यथायोग्य होईल आणि मग पुढच्या चढाईचें काम जास्त सुकर होईल, अशी सर्व शास्त्रज्ञांची खात्री होऊन चुकली.

वेप्रेट या संशोधकानें ही कल्पना विशेष आग्रहानें पुढें मांडली. ध्रुव प्रदेशाच्या भोंवतीं संशोधनाची नाकींच घातलीं पाहिजेत आणि तेथून ध्रुवाकडे उचल केली पाहिजे ही त्याची कल्पना सर्वच राष्ट्रांना पसंत पडली आणि १८७९ सालीं हॅम्बूर्ग येथें डॉ. जार्ज नू बेअर याच्या अध्यक्षतेखालीं एक आंतरराष्ट्रीय ध्रुवपरिषद भरली. काम अपुरें राहिलें म्हणून लगेच पुढल्या वर्षी स्वित्झर्लंडची राजधानी बर्न येथें या परिषदेची दुसरी बैठक झाली. युरोपांतील अनेक राष्ट्रांचे प्रतिनिधि या सभेला आलेले होते. तेथें असें ठरलें कीं, प्रत्येक राष्ट्रानें ध्रुवप्रदेशाच्या बाजूनें एक किंवा अनेक ठाणीं घालावीं आणि १८८२ च्या ऑगस्ट महिन्यापासून

तों संतत बारा महिनेपर्यंत या ठाणेदारांनीं आपलीं निरीक्षणें नोंदीत रहावें. वर्षाच्या शेवटीं या सर्व नोंदींची तुलना व्हावी. हें काम बारभाईच्या रूपाचें होतें; पण तें अगदीं खऱ्या अर्थानें यशस्वी झालें.

नॉर्वेजियन लोकांचें ठाणें **बॉसेकॉ**; स्विडिश लोकांचें **स्पिटस्‌बर्जन**; डच लोकांचें सायबेरियांतील **येनीसे नदीच्या** मुखांत; रशियन लोकांचें **लेना नदीच्या** मुखांत व **नोव्हाझेम्ला** बेटांत; फिन लोकांचें **सोडान्तिला** या बंदरांत; अमेरिकनांचें **अलास्का** द्विपकल्पाच्या **पॉईंट बॅरोव लेडी फ्रँकलिन्** बे येथें; ब्रिटीश लोकांचें **कानडांतील ग्रेट स्लेव्ह् लेकच्या** कांठीं; डेन लोकांचें **ग्रीनलंड** मधील **गोथाब** येथें; आणि ऑस्ट्रियन लोकांचें **जान मेयन** येथें, अशीं निरनिराळीं ठाणीं पडलीं. यांपैकीं डच लोकांच्या ठाण्यावरून परिस्थितिविशेषामुळें, विशेषसें काम घडलें नाहीं. परंतु बाकीच्या लोकांनीं आपापलीं कामें उत्तम बजावलीं आणि या सर्व नोंदींची बेरीज झाल्यानंतर ध्रुव-प्रदेशावर स्वारी करावयाची झाली तर ती कोणीकडून व कशी करावयास हवी याचीं अनुमानें शास्त्रज्ञांना करतां येऊं लागलीं. अर्थातच या अनुमानांत पुष्कळच अंतर पडलें आणि तसें होणें अपरिहार्य होतें. पण एकंदरीनें पाहतां उत्तर ध्रुवाच्या संशोधनांत हा एक फार मोठा टप्पा गांठून झाला हें निःसंशय खरें आहे.

या संशोधनांतील श्रेयाचा फार मोठा वाटा डॉ. नानसेन् याच्याकडे जातो. हा नानसेन् नॉर्वे देशांतील एक संशोधक होता. हा शास्त्रज्ञही होता आणि मुत्सद्दीही होता. **ख्रिस्तिआनिया** या राजधानीच्या जवळच एका गांवीं १८६१ ऑक्टोबर १० ला याचा जन्म झाला. पंधरा वर्षांचा झाल्यावर तो राजधानींतील एका शाळेंत जाऊं लागला. शालेय शिक्षण संपवून १८८० त ख्रिस्तिआनिया विश्वविद्यालयांत तो दाखल झाला. तेथें

त्यानें प्राणिशास्त्राचा अभ्यास विशेषत्वानें केला. पुढें दोन वर्षांनीं व्हायकिंग या नांवाच्या एका मच्छिमारी बोटीच्या तांडेलाबरोबर ग्रीनलंडच्या बाजूच्या समुद्रांतून तो फेरी मारून आला. पुढें इटलींतील नेपल्स येथें प्राणिशास्त्र-मंदिरांत अभ्यासासाठीं तो कांहीं दिवस राहिला आणि तेथें त्याच विषयावर कांहीं पत्रकें त्यानें लिहिलीं. होतां होतां संशोधक विद्वान् म्हणून त्याची ख्याति झाली आणि १८८७त खिस्तिआनिया या विश्वविद्यालयानें त्याला 'डॉक्टर' ही पदवी दिली. पण एकीकडे हा शास्त्राभ्यास चालू असतां नान्सेनचें मन ग्रीनलंडकडे झालेल्या सफरींत वावरत असे आणि शेवटीं भूपृष्ठाचें संशोधन हाच आपला मुख्य जीवितहेतु आहे असें त्यानें ठरविलें.

ग्रीनलंडचा शोध आधींच लागलेला होता व बहुतेक सारे संशोधक त्याच्या दक्षिणभागाच्या कांठाकांठानें हिंडलेले होते. या विशाल बेटाचें सर्व पृष्ठ बर्फानें भरून गेलेलें असे. म्हणून आंत शिरावयास कोणी फारसें धजावत नसे. नानसेननें ठरविलें कीं, पूर्वेकडून या बेटांत शिरावयाचें आणि तें सर्व पायांखालीं घालून त्याच्या पश्चिमेकडील समुद्रतीरावर जाऊन पोहोचावयाचें. ओटोस्वड्रुप, कॅप्टन दित्रिशन् आणि के. के. त्राना या तीन मित्रांना त्यानें बरोबर घेतलें. तसेंच बर्फमय प्रदेशावरील वाट-चालीची माहिती नीट व्हावी म्हणून लॅप्लॅन्ड-बेटावरील दोन माणसेंही त्यानें बरोबर घेतलीं. १८८८ च्या मे महिन्यांत तो स्वदेशांतून निघाला आणि प्रथम आईसलंड बेटांत जाऊन उतरला व तेथून एका मच्छीमारी बोटींत बसून ग्रीनलंडच्या पूर्वकिनाऱ्याकडे निघाला. ऑगस्टच्या १६ तारखेला या बेटावरील बर्फाची चढण सुरू झाली. थंडी मी म्हणत असे. वादळें तर चारी दिशांनीं घोंघावत असत. या विशाल बेटाचें पृष्ठ बरखालीं झालेलें असून कोठें कोठें त्याची उंची आठ आठ हजार फूट सुद्धां आहे.

उंच असो अगर सखल असो तें नेहमीं बर्फानेंच भरलेलें असतें. चढतां चढतां हे संशोधक सप्टेंबर ५ ला सर्वांत उंच पठारावर जाऊन पोहोंचले आणि २८ तारखेला अमेरालिक् आखातापाशीं ते ग्रीनलंडच्या पश्चिम किनाऱ्यावर जाऊन पोहोंचले !

गोथाब या ठाण्यावर हिंवाळ्याचे दिवस काढणें त्यांना भागच पडलें. तेथें नानसेन् यानें एस्किमो जातीच्या लोकांची चांगली ओळख करून घेतली. आणि या वेळीं जमा केलेल्या माहितीवरच ' एस्किमो लोकांचा जीवनक्रम ' या नांवाचें एक पुस्तक त्यानें लिहिलें. १८८९ च्या मे महिन्यांत ही मंडळी परत नॉर्वेला आली आणि पुढें तीन वर्षांनीं या प्रवासांत केलेलीं शास्त्रीय निरीक्षणें नानसेन् यानें शास्त्रीय रूपानें प्रसिद्ध केलीं. आतां त्याची ख्याति विशेषच झाली होती. म्हणून ख्रिस्तिआनिया विश्वविद्यालयांत त्याला एक नोकरीही मिळाली. सर्व स्थिरस्थावर झाल्यावर प्रो. मायकेल सारस याची मुलगी इव्हा हिच्याशीं त्यानें लग्न केलें.

ग्रीनलंडचें गूढ उकललेलें होतें; म्हणून त्या बेटाच्या संशोधनाची मातब्बरी संपलेली होती. नानसेन्ला वाटूं लागलें कीं, या बेटाच्या पूर्व किनाऱ्यानें वर वर जावें आणि उत्तर-ध्रुवाचा शोध लावावा. मग त्यानें एक योजना तयार केली आणि ती प्रथम स्वदेशांतील भूगोल-समितीपुढें त्यानें मांडली. १८९२ त हीच योजना त्यानें लंडन येथील रॉयल जॉग्रॅफिकल सोसायटी या संस्थेकडे धाडली. या योजनेवर त्याच्या स्वतःच्या देशांत बरीच प्रतिकूल टीका झाली; पण शेवटीं नॉर्वेच्या लोकसभेनें म्हणजे पार्लमेंटनें त्याला मदत करावयाचें ठरविलें. सरकारनें खर्चाचा $\frac{2}{3}$ भाग पसंत केला आणि उरलेली रक्कम वर्गणीच्या रूपानें जमा करावी असें ठरलें. या वर्गणीदारांत किंग ऑस्करपासून अगदीं सामान्य माणसापर्यंत सर्व लोक सामिल झाले !

एकीकडे या मोहिमेची तयारी चालू असतांना नानसेन् आपल्या कामाचा बारिक बारिक तपशील ठरवीत होता. उत्तर-ध्रुव-समुद्रावरून वाहणारे वारे आणि जलप्रवाह यांचा फार सूक्ष्म अभ्यास त्यानें चालू ठेवला होता. या प्रवाहाबरोबर निरनिराळ्या तऱ्हेचीं लाकडें वहात येत असत. ग्रीनलंड आणि स्पिट्स्बर्जन् यांच्या आसपासच्या बर्फानें भरलेल्या पाण्याच्या शेजारूनच हे प्रवाह दक्षिणेकडे येतात. अवलोकन करतां करतां नानसेन् याला दिसून आलें कीं, सर्वच ध्रुव प्रदेशांत हे शीतप्रवाह वहात असावेत; खुद्द ध्रुव-बिंदूवरूनही हे शीत प्रवाह दक्षिणेकडे येत असले पाहिजेत. याच प्रवाहांचा उपयोग करून घेण्याचें नानसेन्नें ठरविलें.

ग्रीनलंड बेट ओलांडून जातांना ठेवलेलें धोरणच त्यानें याही कामाला लागू केलें. तें धोरण असें कीं, सगळ्यांत अवघड जागेपासून सुरवात करावयाची आणि मग परत म्हणून फिरावयाचें नाहीं. अर्थातच परतीच्या वाटेची तरतूद करणें किंवा मदतीसाठीं एकादें जहाज मागून आणवणें या दोन्ही गोष्टींना त्यानें अगदीं टाळा दिला होता. अतिशय अवघड जागेपासून सुरवात झाल्यामुळें पुढें होणारा प्रवास उत्तरोत्तर कमी अवघड होत जाणार हें उघडच होतें. हीच प्रवासनीति ध्रुवप्रदेशाच्या संशोधनांत सुद्धां नानसेन्नें लागू केली.

'फ्राम' नांवाचें एक अतिशय बळकट जहाज त्यानें मुद्दाम बांधविलें. इतकें बळकट कीं, बर्फाचा दाब किती जरी पडला तरी त्याच्या दोन्ही बाजू मोडूं नयेत. शिवाय त्याची इतर रचना अशी केली होती कीं, दोन्ही बाजूंनीं बर्फ जरी त्याच्या अंगावर लोटत आलें तरी तें त्याच्या कैचींत सांपडण्याच्या ऐवजीं वर उचललें जावें; आणि दोन्ही बाजूचें बर्फ त्याच्या खालीं यावें. इतर गोष्टींतही ही योजना शास्त्रीय पद्धतीनें तयार केली होती. आतांपर्यंत केवळ अनुमान धक्क्यानें घातलेल्या पद्धतीपेक्षां या मोहिमेची पद्धति सर्वांत वेगळी होती.

ओटोस्वर्द्रुप याचें नांव वर आलेलेंच आहे. हा फ्राम जहाजाचा तांडेल होता. नानसेन् यानें इतर आणखी ११ माणसें बरोबर घेतलीं. १८९३ च्या उन्हाळ्यांत फ्राम जहाज खिस्तिआनिया राजधानींतून निघालें. तें नॉर्वेच्या उत्तरेकडे जाऊन थेट **कारा समुद्रांत** गेलें. पूर्वेकडे जातां जातां तें आशियाच्या उत्तर किनाऱ्यानें **न्यू सायबेरियन् आयलंडस** येथें सप्टेंबर २० ला जाऊन पोहोंचलें. तेथें नानसेननें केलेली जहाजाची योजना कसोटीस लागावयाची होती. या ठिकाणीं फ्राम जहाज शीत प्रवाहाच्या तडाक्यांत सांपडलें. अपेक्षा होती त्याप्रमाणें दोन्ही बाजूंनीं बर्फाचा दाब पडूं लागला आणि बुडाच्या कण्यापासून सबंध जहाजच्या जहाज पाण्याच्या पृष्ठावर तरंगूं लागलें.

बर्फाचा प्रवाह वांकडा तिकडा चालला होता. पण एकंदरीनें तो वायव्येच्या रोखानें चालला होता. १८९५ नोव्हेंबर १५ ला ८५° अक्षांशाच्या पुष्कळच पुढें हें जहाज गेलें. मग प्रवाह थेट पश्चिमेकडे वळला आणि लवकरच तो दक्षिणेकडे वळल्यावर बर्फाची खांडोळीं झालीं. जुलै १५ पर्यंत ' फ्राम ' जहाजाला फारशी प्रगति करतां आली नाहीं. १८९६ ऑगस्ट १३ ला शेवटीं बर्फाच्या तावडींतून सुटून हें जहाज स्पिटस्बर्जनच्या उत्तर किनाऱ्याला येऊन लागलें. इतक्या उंच अक्षांशापर्यंत पूर्वी कोणाचेंही जहाज गेलेलें नव्हतें आणि तेव्हांपासून दुसरें एकादें गेलें आहे कीं काय हें निश्चयानें सांगवत नाहीं.

शीत प्रवाहाबरोबर ' फ्राम ' जहाज वाटेल तिकडे हेलपाटत गेलें; पण नवीन जमीन त्याला कोठेंही दिसली नाहीं. नानसेन् यानें या प्रवाहाचा आश्रय मुद्दामच घेतला होता. हा शीतप्रवाह जिकडे जिकडे जाईल तिकडे तिकडे ' फ्राम ' जहाज गेल्यामुळें ध्रुव समुद्राचा बहुतेक सारा भाग या संशोधकाच्या दृष्टीस पडला. शेवटीं त्या प्रवाहानें यांना आतांच

सांगितल्याप्रमाणें स्पिटस्बर्जनच्या उत्तर किनाऱ्याजवळ आणून सोडलें. नवी जमीन कोठेंच दिसली नाहीं. पण यांनीं ठिकठिकाणीं समुद्राची खोली मात्र मोजून पाहिली. तेव्हां दिसून आलें कीं, ध्रुवसमुद्र अतिशय खोल आहे. कोठें कोठें याची खोली २००० पुरुषांहूनही जास्त भरली. खुद्द ध्रुव बिंदूच्या बाजूला तर ही खोली वाढतच चालली आहे असें दिसलें. स्पिटस्बर्जनच्या किनाऱ्याला लागल्यावर नानसेन् यानें दुसरा एक मोठा धाडसी प्रयत्न करून पाहिला.

पुन्हां एकदा शीत प्रवाहांत प्रविष्ट व्हावें, तर परिस्थितीची अनुकूलता दिसेना. म्हणून त्यानें असें ठरविलें कीं, कुत्र्यांनीं ओढावयाच्या सरक गाड्यांवर बसावें आणि त्या बर्फपृष्ठावरून ध्रुवबिंदूकडे जोरानें दौड करावी. ही दौड तर अतिशय अवघड होतीच होती; पण ती यशस्वी होऊन आपण परत आलों तर ' फ्राम ' जहाज आपल्याला स्पिटस्-बर्जनच्या किनाऱ्याला भेटेलच अशी शाश्वती त्याला वाटत नव्हती आणि परतीचा मार्ग खुंटून जाणार होता. पण हें दुहेरी साहस करावयाचें नानसेननें ठरवलें.

१८९५ मार्च १४ ला हा सरकगाडीवरचा प्रवास सुरू झाला आणि एप्रिल ८ ला ते ८६° अक्षांशाच्याही थोडेसे वरच गेले. ध्रुवबिंदूच्या इतके नजीक आतांपर्यंत कोणीही गेलें नव्हतें. तेथून ते नैर्ऋत्येच्या रोखानें परत वळले. कांहीं कांहीं ठिकाणीं सरकगाड्यांवरून त्यांना जातां आलें; पण कांहीं कांहीं ठिकाणीं बर्फाच्या खडप्यामध्यें पाण्याच्या ज्या चोळी राहिलेल्या असतात त्यांत, आपल्या अगदीं हलक्या नावा सोडून—त्यांना पुढें जावें लागलें. बर्फावर अस्वलांचा उपद्रव फार होई; आणि पाण्यांत असतांना वॉलरस प्राणी त्यांना उपद्रव देत असत. पण या सगळ्या संकटां-तून बचावून नैर्ऋत्येकडे येतां येतां फ्रांझ जोसेफ लॅन्ड् येथें ते सुख-

रूप येऊन पोहोंचले. या द्वीपसमूहांतून ऑगस्ट २८ पर्यंत ते पश्चिम बाजूनें वाटचाल करीत राहिले आणि मग जॅक्सन बेटावर त्यांनीं एक एक लहानसें दगडी घरकूल केलें. जवळ एक हलकासा रेशमी तंबू होता. तो झांकण म्हणून या घरकुलावर त्यांनीं घातला. संबंध हिंवाळा या ठिकाणीं त्यांनीं कुडकुडतच घालविला. अस्वल किंवा वॉलरस् मारावा; आणि त्याचें मांस व्हेल माशाच्या चरबीच्या चुलीवर शिजवावें असा क्रम चार महिने चालला होता. आपण एस्किमो आहों असेंच त्यांना वाटू लागलें!

१८९६ च्या वसंतांत ते दक्षिणेकडे निघाले. जून १५ ला जॅक्सन् यानें त्यांच्यासाठीं एक जहाज आणलेलें होतें. तें त्यांना भेटलें. त्यांत बसून हे संशोधक नॉर्वेला परत गेले. परत आल्यावर मागें सोडलेल्या 'फ्राम' जहाजाचें काय झालें अशी चिंता त्यांना लागून राहिली. पण योगायोगाची गोष्ट अशी कीं, हे लोक ज्या दिवशीं इकडे येऊन पोहोंचले त्याच दिवशीं स्पिटस्बर्जनच्या किनाऱ्यापासून बऱ्याच अंतरावर बर्फांत अडकून पडलेलें तें जहाज, समुद्रांतील घडामोडीमुळें एकदम मोकळें झालें आणि त्यावरील तेराच्या तेरा लोक ख्रिस्तिआनियाला परत आले. विशेष लक्षांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे एवढ्या बिकट प्रवासांत फ्राम जहाजाला कसलेंही नुकसान पोहोंचलें नाहीं; आणि मोहिमेंतील एकही मनुष्य दगावलें नाहीं; कारण स्व्हर्डुप हा मोठा बांका तांडेल होता.

खुद्द नॉर्वेंत नानसेन् याचा मोठाच जयजयकार झाला. इंग्लंडच्या लोकांनीं १८९७ फेब्रुआरी ८ या दिनांकीं त्याला आपल्या राजधानींत बोलावून नेलें; आणि तेथें अल्बर्ट हॉलमध्यें आपल्या प्रवासाची रोमहर्षण कथा त्यानें इंग्रज श्रोत्यांना निवेदन केली.

उत्तरध्रुव-संशोधनाच्या कामांत परिपूर्ण यश मिळविणारा शेवटचा संशोधक म्हणजे पीरी हा होय. हा अमेरिकन गृहस्थ १८५६ मे ६ या दिनांकीं

क्रेसॉन येथें जन्माला आला. १८७७ त पदवीधर झाल्यावर पुढें तीन वर्षांनीं अमेरिकेच्या नाविकदलांत लेफ्टनंट म्हणून त्याची नेमणूक झाली. एंजिनीअर या नात्यानें, कालव्यांची पाहणी करण्याच्या कामांत त्याचे बरेच दिवस गेले; आणि १८८६ त ग्रीनलंडच्या पश्चिम किनाऱ्याचा शोध करण्यासाठीं तो निघाला. डिस्को उपसागरांत तो कांहीं दिवस




फिरत राहिला. उत्तरध्रुव – संशोधनाचें काम या तळावरून सुरू करावें

असें त्याच्या मनांत होतें. १८९१त फिलॅडेल्फिया ॲकॅडेमी ऑफ नॅचूरल् सायन्सेस या संस्थेनें ध्रुवसंशोधनाच्या मोहिमेचें पुढारीपण त्याला दिलें. या मोहिमेंत एकंदर सात माणसें होतीं. त्यांतच त्याची बायकोही होती.

१८९२ च्या वसंतांत एका नॉर्वेजियन मित्राला घेऊन तो **ग्रीनलंडच्या** ईशान्य किनाऱ्याला गेला. तेव्हां त्याला दिसून आलें कीं, ग्रीनलंड हें एक बेट आहे. नानसेन् यानें ती भूमि ओलांडली होती हें खरें; पण हा त्याचा पराक्रम ग्रीनलंडच्या दक्षिण भागांत झालेला होता. उत्तरेकडे ही भूमि कुठपर्यंत पसरलेली आहे हें कोणालाच कळलेलें नव्हतें. पीरीनें दाखवून दिलें कीं, हें मोठें विशाल खरें, पण एक बेट आहे. या उत्तर टोंकाकडील एस्किमो लोकांच्या जीविताचा नवराबायकोंनीं चांगला अभ्यास केला. त्याच्या बायकोनें या मोहिमेच्या वर्णनाचें एक सुरस पुस्तक लिहिलें.

**इंगल फिल्ड** आखातांत यांनीं आपला तळ केलेला होता. याच ठिकाणीं पीरीबाईंना मुलगी झाली. १८९४ त त्यानें या बेटाची पूर्व-पश्चिम अशी एक फेरी केली. तेथील एस्किमो लोक आभाळांतून पडणाऱ्या तुटलेल्या ताऱ्याच्या पाषाणांचा उपयोग लोखंडाचीं उपकरणें बनवण्याच्या कामीं करीत असत. ते पाषाण त्यांना सांपडले. १८९८ त आपल्या या सर्व संशोधनाचा इतिहास पीरीनें लिहून काढला.

याच वर्षी पीरी आर्कटिक् क्लब आणि मॉरिस् जेसप् यांच्या सहाय्यानें एका नव्या भ्रमन्तीचा आरंभ त्यानें केला. ही भ्रमन्ति चार वर्षेपर्यंत टिकावयाची होती. बरोबरच्या लव्याजम्यांत त्यानें बरेच एस्किमो लोक घेतले होते. लॉर्ड नॉर्थक्लीप यानें विंडवर्ड नांवाचें जहाज पीरीच्या हवालीं केलें. या जहाजांत बसून **स्विथ्** आखातांतून ध्रुवबिंदूकडे जाण्याचा मार्ग काढतां येतो का, हें त्यानें पाहिलें. १८९८–९९ च्या हिंवाळ्यांत

सरकगाड्यांतून त्यानें प्रदीर्घ प्रवास केला. पण या प्रवासांत त्याच्या दोन्ही पायांना क्षतें पडलीं आणि पायांचीं आठ बोटें अजिबात नाहींशीं झालीं. १८९९ ते १९००पर्यंत तो एस्किमो लोकांच्या संगतींतच राहिला. पुढील वसंतांत ग्रीनलंडच्या उत्तरेकडे पुष्कळच दूरपर्यंत तो गेला आणि जातां जातां ८३° अक्षांशाच्या पलीकडे जाऊन पोहोंचला. पुन्हा हिंवाळा आला आणि हा हिंवाळाही त्यानें एस्किमो लोकांच्या संगतींत घालविला. पुढील वसंतांत ८४° अक्षांशाच्याही पुष्कळ पुढें तो गेला. मग मात्र पुढें जाण्याचा आपला मार्ग अगदीं खुंटला आहे असें त्याला दिसून आलें. चार चार वर्षेंपर्यंत या हिम प्रदेशांत आजपर्यंत दुसरें कोणीही राहिलेलें नव्हतें. अर्थात् तो परत आल्यावर अमेरिकन राष्ट्रानें त्याला मोठी शाबासकी दिली.

न्यूयॉर्क येथील पीरी आर्क्टिक् क्लब या संस्थेनें या धाडसी संशोधकाला पुन्हां साहित्य पुरवावयाचें ठरविलें; पैशांची जुळवाजुळव केली; आणि 'रुझवेल्ट' नांवाचें एक जहाज त्याच्या हवालीं केलें. जहाजाचा तांडेल कॅप्टन् बार्टलेट् हा होता. १९०५ सालच्या उन्हाळ्यांत पीरी या नव्या भ्रमन्तीवर निघाला. तो ग्रँड लॅन्डच्या उत्तरकिनाऱ्यावरील केप् शेरिडन् येथें जाऊन पोहोंचला. येथून सरकगाडींतून तो केप् हेक्ला येथें गेला. तेथून ध्रुवाच्या रोखानें एक वेगाची दौड मारण्याचें त्यानें ठरविलें. त्याच्या बरोबर बरेचसे एस्किमो लोक होते. त्यांची आणि पीरी याची चांगली मैत्री जुळलेली होती. त्यांनाही संशोधनाच्या कामांतले आडाखे माहीत झालेले होते. दुसरे कांहीं गोरे लोकही त्याच्या बरोबर होते. दोघांच्या दोन टोळ्या करून १९०६ फेब्रुआरीच्या शेवटीं शेवटीं तो निघाला.

८४° अक्षांशाच्या पुष्कळ पुढें गेल्यावर पाण्याचा एक विशाल टवका त्यांना लागला. परंतु छोट्या, हलक्या बोटी जवळ नसल्यामुळें

यांतून पुढें जावयास त्यांना बराच त्रास पडला. दुर्दैवानें बर्फाची आणि पाण्याची ओढ पूर्व दिशेला जोरानें चालू होती. ती धार तोडून उत्तरेकडे जाणें दिवसेंदिवस कठीण जाऊं लागलें. पण पीरीनें दम सोडला नाहीं. सगळें बळ एकवटून तो तसाच पुढें जात राहिला; आणि १९०६ एप्रिल २१ ला ८७° अक्षांशाच्याही तो पुढें गेला. ध्रुवबिंदूच्या इतक्या जवळ आतांपर्यंत कोणीही गेलेलें नव्हतें.

येथून पुढचा प्रवास अशक्य आहे हें पाहून पीरी परत फिरला. परतीच्या प्रवासांत या मंडळींच्यावर गुदरलेलीं संकटें एवढीं मोठीं होतीं कीं, केवळ दैवयोगानेंच ते परत आले असे म्हटलें पाहिजे. बर्फावरून सरकगाड्या जात असत; पण बर्फाला मधून मधून खांडोळीं पडून, पाण्याचे टवके लागत. त्यांतून पुढें जाणें फार कष्टाचें आणि धोक्याचें बने. कांहीं कांहीं वेळां पायाखालच्या बर्फाचा थर इतका पातळ असे कीं, यांच्या वजनानें तो लपूं लागे. जवळचीं खाद्यपेयें संपून गेलीं. शेवटीं जवळचीं कुत्रीं मारून खाणें त्यांना भाग पडलें. तथापि ग्रीनलंडच्या उत्तर किनाऱ्यावरील केप नुमायर येथें ते कसेबसे येऊन पोहोंचले.

पण पीरीला आतां नवें अवसान चढलें! ध्रुव-समुद्रांतील वाटांची त्याला आतां चांगली माहिती झाली होती; आणि ध्रुवबिंदु गांठण्याचें श्रेय आपण मिळवूंच अशी जबरदस्त आशा त्याला वाटूं लागली होती. तेंच जहाज, तोच कप्तान, पण कांहीं थोडे नवे एस्किमो लोक, असा सरंजाम बरोबर घेऊन पीरी हा १९०८ च्या जुलै महिन्यांत न्यूयॉर्कहून निघाला. केप शेरिडन येथें तो ५ सप्टेंबरला आला. हिंवाळ्याच्या दिवसांत बरोबरच्या अन्नाचे सांठे ग्रँटलँडच्या किनाऱ्यावरील केप कोलंबिया येथें त्यानें पाठवून दिले; आणि तेथूनच आर्क्टिक् दिवसाला सुरवात झाली — इकडील प्रदेशांत सहा महिने दिवस व सहा महिने रात्र

असते — म्हणजे निघावयाचें असें ठरलें. सात संशोधकांची तुकडी येथून निघाली. बरोबर सतरा वाकबगार एस्किमो होते. ग्रीनलंडमधील अस्सल जातीचे १३३ कुत्रे होते आणि दहा सरकगाड्या होत्या.

या वेळची आंखणी पीरीनें कांहींशी निराळी केली होती. थोडेसें सामानसुमान जवळ असलेली एक तुकडी पुढें जावयाची; तिनें मार्गाची निश्चिति करावयाची; वाटेंत अडथळा करणारें बर्फ याच तुकडीनें बाजूला ढकलावयाचें; हिच्या मागून चौघा जणाची एक अशा तुकड्यांची सांखळी जावयाची; प्रत्येक तुकडीपाशीं सरकगाड्या असावयाच्या; यांत अवश्य तें सामानसुमान भरलेलें असावयाचें; आघाडीची तुकडी आणि ही मंडळी याच्यांत एका दिवसाचे अंतर असावयाचें; अशी ही योजना होती.

आतां प्रवास सुरू झाला; हे संशोधक ८४° अक्षांशावर पोहोंचले आणि १९०९ मार्च ५ ला त्यांना तेथें सूर्यदर्शन झालें. या ठिकाणीं समुद्राची खोली ८२५ पुरुष भरली. आणखी ५ दिवसांचा प्रवास झाल्यावर ८५° अक्षांशावरून बरीच मंडळी परत आली आणि शेलके शेलके एस्किमो व कुत्रे तेवढेच संशोधकांच्या जवळ शिल्लक राहिले. येथून पुढचा प्रवास वेळापत्रकाप्रमाणें होऊं लागला. आघाडीचे लोक एका विशिष्ट मर्यादेला गेले म्हणजे तेथें बर्फाचें घरकुल उभें करीत आणि त्यांत निजत. मागून मुख्य मंडळी येऊन दाखल झाली म्हणजे, हे आघाडीचे लोक पुढें चालूं लागत आणि ही आलेली मंडळी त्या घरकुलांत निजून रहात. पुढल्या मुक्कामावर आघाडीच्या लोकांनीं जावें; बर्फाचें घरकुल बांधावें आणि तेथें पडून रहावें; एक दिवसाची विश्रांति होत आहे तोंच मागल्या मंडळींनीं येऊन दाखल व्हावें आणि यांनीं पुढल्या मार्गक्रमणाला लागावें. असें होतां होतां ८६° अक्षांशाच्या पुढें गेल्यावर थकलेले एस्किमो आणि थकलेले कुत्रे घेऊन मार्व्हिन नांवाचा

संशोधक परत फिरला. तो मागे राहिलेल्या जहाजापर्यंत कसाबसा आला, पण तेथेंच बुडून मेला. तिकडे उरलेल्या प्रवाशांचें मार्गक्रमण चालूंच होतें. ८८° अक्षांशावर गेल्यावर एप्रिलच्या १ ल्या तारखेला दोन एस्किमो, एक गाडी आणि अठरा कुत्रे घेऊन बारलेट परत फिरला. आतापर्यंत पीरीनें आपली शक्ति फारशी खर्च केली नव्हती. मार्ग शोधून काढणें, शास्त्रीय निरीक्षणें करणें हीं कामें आपल्या दुय्यमांवर सोपवून ध्रुव-बिंदूपर्यंत टाकावयाच्या शेवटच्या झापेसाठीं त्यानें आपलें सामर्थ्य राखून ठेवलें होतें.

आतां येथून ध्रुवबिंदु १४० मैल दूर राहिलेला होता. हेन्सन हा एक गोरा आणि चार एस्किमो एवढे त्याच्याबरोबर आतां राहिलेले होते. बर्फ थोडें सपाट लागूं लागलें आणि रोज १० तासांच्या चालीनें २५ मैल अंतर तोडतां येऊं लागलें. एप्रिलच्या ६ तारखेला यंत्रानें मोजून पाहिलें तेव्हां ८९° अक्षांशाच्या पुष्कळच पुढें आपण गेलों आहों, असें त्यांना दिसून आलें. या ठिकाणीं त्यांनीं एक दिवसभर तळ टाकला; आणि निरनिराळ्या तऱ्हेचीं निरीक्षणें केलीं. उजव्या हाताला आणि डाव्या हाताला कांहीं मैलपर्यंत मुद्दामच जाऊन पाहिलें, परंतु कोठेंही जमीन म्हणून दिसली नाहीं. बर्फांतून गळ टाकून पाहिला. तो १५०० पुरुष खालीं गेला, तरी समुद्राचा तळ लागला नाहीं. उरलेलें अंतर त्यांनीं हां हां म्हणतां तोडलें आणि हे संशोधक ध्रुवबिंदूवर १९०९, एप्रिल ६ दिनांकीं प्रत्यक्ष जाऊन उभे राहिले ! तेथें त्यांनीं अमेरिकेचें निशाण फडकाविलें; आणि अशा रीतीनें संशोधन-युगाचा परमोच्च बिंदु पीरीनें गांठला.

---

آخری درج شدہ تاریخ پر یہ کتاب مستعار
لی گئی تھی مقررہ مدت سے زیادہ رکھنے کی
صورت میں ایک آنہ یومیہ دیرانہ لیا جائیگا۔

---

# आमचें प्रकाशन

| | | | |
|---|---|---|---|
| मीठभाकर (काव्य) | आवृत्ति दुसरी | ग. ल. ठोकळ | २—८—० |
| सुगी (काव्य) | ,, तिसरी | ,, | ३—०—० |
| गांवगुंड (कादंबरी) | ,, ,, | ,, | ३—०—० |
| कडू साखर (कथा) | ,, दुसरी | ,, | ३—०—० |
| सुगंध ,, | ,, ,, | ,, | ३—०—० |
| मोत्यांचा चारा ,, | | ,, | २—४—० |
| अनामिका (कथा) | | श्री. म. माटे | ३—०—० |
| आजकालचे विद्यार्थि (प्रबंध) | | ,, | २—८—० |
| साहित्यधारा (,,) | | ,, | २—८—० |
| जगाचे प्रवासी : भाग १ (चरित्रें) | | ,, | १—४—० |
| ,, ,, ,, २ (,,) | | ,, | १—४—० |
| ,, ,, ,, ३ (,,) | | ,, | १—४—० |
| बारा शास्त्रज्ञ (चरित्रें) | | ,, | ३—८—० |
| पाणकळा (कादंबरी) | आवृत्ति दुसरी | र. वा. दिघे | ४—८—० |
| सराई (,,) | ,, ,, | ,, | ५—०—० |
| आजच्या गोष्टी : भाग १ (बालवाङ्मय) | | के. नारखेडे | ०—८—० |
| ,, ,, ,, २ (,,) | | ,, | ०—८—० |
| ,, ,, ,, ३ (,,) | | ,, | ०—८—० |
| ,, ,, ,, ४ (,,) | | ,, | ०—८—० |
| कालच्या गोष्टी : भाग १ (,,) | | ,, | ०—१२—० |
| महात्मा फुले (चरित्र) | | आ. अ. मानकर | १—०—० |
| प्रौढांचें शिक्षण व साक्षरताप्रसार (प्रबंध) | | ,, | १—८—० |
| अहल्याबाई होळकर (चरित्र) | | वा. दा. गोखले | ०—१२—० |


**श्री लेखन वाचन भांडार,**

गणपती चौक, लक्ष्मी रोड, पुणें २.